संस्कृतग्रंथार्थसंग्रह.

पुस्तक १६. 

# वेणीबंधन.

हें

संस्कृतांतील वेणिसंहार नाटकाच्याआधा-
रानें मराठींत लिहिलें आहे.

जावजी दादाजी

यांनीं आपल्या

"निर्णयसागर" छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

मुंबई,-सन १८९०.



किंमत ६ आणे.

रून त्याग [illegible] [illegible]वटास नेली. या भारतातील कथेला [illegible] या [illegible] कवीनें हें नाटक रचिलें आहे. यात वीररस [illegible] [illegible] करुण व शृंगार हेही रस प्रसंगविशेषा आले आहेत. यामुळें हें नाटक फारच सुंदर व मनोवेधक झालें आहे.

[illegible] [illegible] कवींचा हेतु रसिकजनांचें [illegible] करणें हा तर आहे खराच; परंतु तो गौण होय. मार्मिक दृष्टीनें पाहिलें असतां यांतील कथेच्या वाचनापासून व्यावहारिक आणि पारमार्थिक अनेक नीतितत्त्वांचें ज्ञान वाचकांस करून द्यावें हा [illegible] हेतु [illegible] असें दिसून येईल. या जगांत जिकडे [illegible] तिकडे कांहीं सज्जन आढळतात व कांहीं दुर्जन आढळतात. सज्जनांचीं अंतःकरणें क्षमा, [illegible] [illegible] सहनशीलता, परोपकारबुद्धि इत्यादि अनेक सद्गुणांनीं व सद्भावनांनीं भूषित अ-

सत्यामुळें त्यांच्यावर कितीही दुर्धर प्रसंग आले, तथापि ते आपल्या सत्वापासून कधींही भ्रष्ट होत नाहींत; यामुळें परमेश्वर नेहमीं त्यांच्यावर संतुष्ट राहून संकटसमयीं त्यांचें साह्य करितो व परिणामीं त्यांस सुख होतें. दुर्जनांच्या अंतःकरणांत काम, क्रोध, लोभ, दुरभिमान, द्वेष इत्यादि अनेक दुर्गुणांचें वास्तव्य असल्यामुळें सज्जनांचा छळ व अपमान करण्याविषयीं ते निरंतर प्रयत्न करीत असतात. अन्यायानें दुसऱ्याचें सर्वस्व हरण करून त्यावर चैन भोगणें हाच त्यांचा नेहमींचा धंदा होऊन राहतो. त्यांस कोणीं सामोपचारांनीं बुद्धिवाद करून ताळ्यावर आणण्याचा प्रयत्न केला तर ते मदांध असल्यामुळें त्याचें ऐकत नाहींत, एवढेंच नव्हे, तर त्या उपदेशकाचा ते उलटा द्वेष करूं लागतात. अशा आचरणानें त्यांच्यावर परमेश्वराचा कोप होऊन परिणामीं त्यांस अत्यंत दुःख

आणि विपत्ति भोगावी लागते. या नीतितत्वाचा बोध उदाहरणद्वारा कवीनें फार उत्तम प्रकारें केला आहे.

आणखीही एक व्यावहारिक बोध या ग्रंथापासून घेण्यासारखा आहे. तो हा कीं, आपल्या लोकांत भावांभावांमध्यें नेहमीं कलह होत असतात हें प्रसिद्धच आहे. जो सबळ असतो तो अन्यायानें दुर्बळाचें सर्वस्व हरण करून प्रसंगीं त्याला भिकेसही लावण्यास मागेंपुढें पाहानाहीं, व कोणी मध्यस्थी करून त्यास सामोपचाराच्या गोष्टी सांगून कलह मिटविण्याचा प्रयत्न करूं लागलें तर दुराग्रहास पेटून त्याचें तो ऐकत नाहीं; यामुळें दुर्बळाला शेवटीं न्यायदेवतेकडे दाद मागणें जरूर पडतें. मग तेथें अर्थातच योग्य न्याय होऊन अन्यायानें वागणाराचें पारिपत्य होतें; यासाठीं अन्यायानें दुसऱ्याच्या वित्ताचा अपहार केला असतां परि-

णार्मी कधींही यशप्राप्ति व्हावयाची नाहीं हें सर्वांनीं लक्ष्यांत ठेवावें.

सारांश, नीतीनें आणि सदाचरणानें वागणाऱ्यांवर परमेश्वराचा प्रसाद होऊन ते या जगांत कसे सुखानें नांदतात, व दुराचरणानें वागणाऱ्यांवर परमेश्वर रुष्ट होऊन त्यांची कशी हालअपेष्टा होते याचें सुरेख चित्र कवीनें या ग्रंथांत दाखविलें आहे.

मूळग्रंथ संस्कृत भाषेंत असल्यामुळें त्यांतील बोधामृताची गोडी प्राकृत जनांस दुर्लभ जाणून मुख्यत्वेंकरून त्यांच्याच उपयोगासाठीं मूळग्रंथाच्या आधारानें ही गोष्ट मराठी भाषेंत गद्यरूपानें लिहिण्याचा प्रयत्न केला आहे. हिच्या वाचनानें ग्रंथकर्त्याचे हेतु अंशतः जरी सिद्धीस गेले तरी या प्रयत्नाचें सार्थक्य झालें असें आह्मी समजूं.

तारिख २१ एप्रिल १८९०.

# वेणीबंधन.

---

बारा वर्षे वनवास आणि एक वर्ष अज्ञातवास भोगून **पांडव द्रौपदी**सहवर्तमान **हस्तिनापुरास** परत आल्यावर ते **कौरवां**जवळ राज्याचा विभाग मागूं लागले; परंतु तो कपटी **दुर्योधन** त्यांचें मागणें कबूल करीना; यामुळें **कौरवपांडवां**मध्यें युद्धरूप कल्पान्तानल प्रदीप्त होऊन त्यांत उभयपक्षांकडील लक्षावधि वीरांच्या आहुति पडणार हें जाणून तो अनर्थ टाळण्याकरितां; जगाची उत्पत्ति, स्थिति आणि लय करण्याविषयीं महासमर्थ साक्षात् **नारायण,** जो सज्जनांचें संरक्षण आणि दुर्जनांचा नाश करण्याकरितां **देवकी**च्या उदरीं अवतीर्ण झाला, तो भगवान् **श्रीकृष्ण दुर्योधना**ला सामोपचारानें वळविण्याकरितां मध्यस्थ होऊन त्याजकडे गेल्या-

वर **भीमसेन सहदेवा**बरोबर गोष्टी बोलत बसला होता; तेव्हां एका स्तुतिपाठकाच्या तोंडून त्यानें असे शब्द ऐकिले कीं, "शत्रूंचें प्रशमन करून व वैराग्नि शांत करून **श्रीकृष्णा**सहवर्तमान **पांडव** सुखानें नांदोत, आणि भूतळावर क्षतविग्रह आणि रक्तवान् असे होत्साते **कौरव** स्वस्थ होवोत." '**कौरव** स्वस्थ होवोत' हे शब्द कानीं पडतांच **भीमसेन** अत्यंत क्रुद्ध होऊन व भोंवया वर चढवून मोठ्या त्वेषानें ह्मणाला, "**सहदेवा,** कोण बरें हा दुरात्मा अधम अशी बडबड करीत आहे? अरे, त्याला माहित नाहीं काय कीं, लाक्षागृहांत कोंडून व वि-

---

१ हीं पदें श्लिष्ट आहेत. यांच्या योगानें दोन अर्थ होतात, ते असे. **कौरव** युद्धापासून निवृत्त होत्साते प्रेमभावानें राहून सुखी होवोत, व दुसरा अर्थ त्यांचे देह छिन्नविच्छिन्न होत्साते रक्तानें भरून शेवटीं ते मरण पावून स्वर्गस्थ होवोत.

षमिश्रित अन्न चारून ज्यांणीं आमचा प्राणघात करण्याचा प्रयत्न केला व कपटद्यूतांत आमचें सर्वस्व हरण केलें; एवढेंच नव्हे तर **द्रौपदील** केश धरून भरसभेंत ओढीत आणण्याचें अत्यंत नीच कर्म करून ज्यांणीं आह्मांस निरुपायास्तव लज्जेनें खालीं पाहावयास लाविलें ते दुरात्मे **धृतराष्ट्रा**चे कार्टे मी जिवंत असतां स्वस्थ होतील असें कधींही घडावयाचें नाहीं." हें ऐकून **सहदेव** ह्मणाला, दादा, असे रागावूं नका, शांत व्हा. आपण जें भाषण ऐकिलें तें आपणाला मंगलप्रदच आहे; कसें ह्मणाल तर, शत्रूंचें प्रशमन ह्मणजे नाश करून आह्मीं **श्रीकृष्णा**सहवर्तमान आनंदानें राहावें, आणि कौरवांचे देह छिन्नविच्छिन्न होऊन त्यांतील रक्तानें समरभूमि भरून जावी आणि सर्व कौरव स्वस्थ ह्मणजे स्वर्गस्थ व्हावे अर्थात मरून जावे असा यांतील गर्भितार्थ आहे." **भीमसेन** धिक्कारयुक्तमुद्रेनें ह्म-

णाला, “ छे छे ! असें कसें होईल ! **कौरव** हे आमचे बंधु. त्यांच्याविषयीं असा अमंगल वाद कोण करील? त्यांच्या आर्जवानें आह्मीं राहावें हेंच योग्य ! ” **सहदेव** ह्मणाला, “दादा, तुह्मी असे लावून बोलूं नका. धार्तराष्ट्रांनीं आमच्याशीं वैर मांडून जो पदोपदीं आमचा छळ केला तो आह्मांला समजत नव्हता असें नाहीं, आणि **धर्मराज** महाराज जर आड आले नसते तर आह्मी कोणी मुकाट्यानें तो सहन करून स्वस्थ बसलों असतों असेंही नाहीं; पण **महाराजां**कडे पाहून आह्मांला तसें करणें भाग पडलें.” **भीमसेन** ह्मणाला, “ह्मणूनच तुमचें आमचें आजपासून जमणार नाहीं. **कौरवां**विषयीं माझें जन्मतः हाडवैर आहे; त्याला **धर्मराज** किंवा **अर्जुन** किंवा तुह्मी दोघे कोणीही कारण नाहीं. तुह्मीं त्यांच्याशीं संधि करावयाचा ह्मणतां; खुशाल करा जा. माझा तर असा निश्चय आहे

कीं, **जरासंधाचें** जडवलेलें शरीर जसें पुनः पुनः मीं फाडून टाकिलें त्याप्रमाणें तुह्मीं केलेला संधि मी मोडून टाकणार." **सहदेव** ह्मणाला, "दादा, तुह्मी असे क्रोधाविष्ट झालां ह्मणजे **धर्मराजा**-लाही केव्हां केव्हां राग येतो व खेदही वाटतो," **भीमसेन** ह्मणाला, "काय ह्मणतोस, ! **धर्मराजा**-ला राग येतो व खेद होतो ? असें त्याला स्वप्नांत देखील व्हावयाचें नाहीं. राग ही वृत्ति त्याच्या अन्तःकरणांत जर वास करीत असती तर त्या राजसभेमध्यें **दुःशासनानें** **पांचालीला**[1] केश धरून फरफरां ओढीत आणिली हें अत्यंत अपमानास्पद कर्म त्याच्यानें स्वस्थ बसून कसें पाहावलें असतें ? तसेंच वल्कलें धारण करून जंगली लोकांत आह्मी एक दोन दिवस नव्हे, तर एकसारखीं बारा वर्षें घालविलीं व एक वर्ष-पर्यंत गुप्त वेषानें **विराटराजाच्या** आश्रयास

---

१ **पांचालदेशचा** राजा **द्रुपद** याची कन्या **द्रौपदी**.

राहून भिकाऱ्यांसारखे अत्यंत नीच धंदे कर-
ण्याचें पत्करून राहिलों या गोष्टीचें त्याला
कांहींच वाटूं नये काय? व ज्यांणीं आह्मांस
इतके क्लेश दिले त्यांच्या विषयीं कांहींच क्रो-
धबुद्धि होऊं नये काय? या त्यांच्या कृतींनीं
वृद्धिगत झालेल्या क्रोधाग्नीनें माझें अन्तःकरण
तर पोळून गेलें आहे; यासाठीं तू जाऊन **धर्म-
राजा**ला माझी हात जोडून विनंति सांग कीं,
तुमच्या आज्ञेचें उल्लंघन करणें सर्वथा अयोग्य
होय; तथापि तें केल्यावांचून आतां माझ्यानें
राहावत नाहीं. यामुळें माझ्या बंधुवर्गांत मी क-
दाचित् निंदेस पात्र होईन; तथापि तेंही मला
पत्करेल. मला जो संताप झाला आहे त्याच्या
योगानें आजचा दिवस मी तुमचें वडीलपणा-
चें नातें एका बाजूस गुंडाळून ठेवून या ग-
देच्या प्रहारांनीं **कौरवांचा** समूळ उच्छे-
द करण्याचा माझा निश्चय झाला आहे तो

कधींही ढळावयाचा नाहीं." याप्रमाणें रागानें चडफडत आयुधें आणण्याकरितां राजवाड्यांतील आयुधगृहाकडे तो जाऊं लागला. जातांना वाटेंत **पांचाली**चा चौक लागला तो पाहून तिला भेटून पुढें जावें असें मनांत आणून **सहदेवा**चा हात धरून तो तिच्या मंदिरांत गेला. तेथें ती नव्हती, ह्मणून तिची वाट पाहात क्षणभर बसला असतां तो **सहदेवास** विचारूं लागला, "वत्सा **सहदेवा**, भगवान् **श्रीकृष्ण कौरवां**बरोबर संधि करणार ह्मणून तू सांगतोस, तर तो कसा संधि करणार हें तुला माहीत आहे काय?" **सहदेव** ह्मणाला, "फक्त पांच गांव आमच्या निर्वाहाकरितां मागावयाचे, दुसरें कांहीं नाहीं." हें ऐकतांच **भीमसेनास** अत्यंत वाईट वाटलें आणि तो ह्मणाला, "हर हर! काय ही प्रारब्धाची दशा! अरे, त्या अजातशत्रु **धर्मराजाच्या** अंगीं अत्यंत उग्र असें जें क्षात्रतेज झळकत

होतें तें आज गेलें तरी कोठें? मला वाटतें द्यूतामध्यें त्याणें तेंही गमावून टाकिलें; एरवीं अशी नीच याचना त्याच्यानें करवती ना. **सहदेवा,** तुझें हें भाषण ऐकून माझें तर हृदय थरथर कांपतें; यासाठीं तू मला कांहीं सांगितलें नाहीं व मीही कांहीं ऐकिलें नाहीं असें समज." असें ह्मणून त्यानें दोन्ही कानांवर हात ठेविले. इतक्यांत **द्रौपदी** आपल्या **बुद्धिमतीका**दासीसहवर्तमान त्या ठिकाणीं येत होती. तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहात होत्या, व दुःखानें ती अगदीं म्लानवदन झाली होती. तिला दुरून येतांना पाहून **सहदेवास** वाटलें कीं, वर्षाकाळीं विद्युल्लतेचा जसा क्षोभ होतो त्याप्रमाणें, हिला रडतांना पाहून अगोदरच क्रुद्ध झालेले **भीमदादा** काय अनर्थ करतील कोण जाणे." **बुद्धिमतिका** नानातऱ्हांनीं द्रौपदीचें सांत्वन करीत असतां ती तिला ह्मणाली, "अग **बुद्धिम-**

**तिके**, तू ह्मणतेस तें सारें खरें; **भीमसेन**महाराज त्या दुष्टांविषयीं[1] रात्रंदिवस मनांत जळफळत असतात व त्यांणीं मनावर घेतलें तर ते माझ्या दुःखाचा प्रतीकार करतील हें खरें, पण थोरले महाराज[2] अनुकूल होतील तर ना साऱ्या गोष्टी?" असें ह्मणत **भीमसेन** बसला होता तेथें ती येऊन पोंचली, तरी तो तिजकडे पाहीना; तेव्हां ती दासीला ह्मणाली, "प्राणनाथ या वेळेस क्रोधाधीन असल्यामुळें मजकडे पाहात देखील नाहींत; पण येणेंकरून मला वाईट वाटत नाहीं; उलटें माझ्या दुःखाच्या प्रतीकाराचें हें आश्वासनच आहे, असें समजून मला आनंदच होत आहे." असें ह्मणून पुढें तो काय करतो तें पाहाण्यासाठीं त्या दोघी जणी मुकाट्यानें तेथेंच एका बाजूस उभ्या राहिल्या. इकडे **भीमसेन** मोठ्या क्रोधावेशानें **सहदेवास** ह्मणाला, "सह-

---

१ **कौरवां**विषयीं. २ **धर्मराज.**

**देवा, धर्मराज** खुशाल पाहिजे तसा त्यांच्याशीं संधि करो. माझा तर निश्चय आहे कीं, त्या शंभरही कौरवांचा फडशा पाडून त्या दुष्ट **दुःशासनाच्या** वक्षस्थलांतील रक्त मी गटगटां पिईन व त्या दुरात्म्या **दुर्योधनाच्या** मांडीचें या गदेच्या प्रहारानें चूर्ण करून टाकीन तेव्हांच मी स्वस्थ बसेन, समजलास! **द्रौपदी** हें भाषण ऐकत होतीच. तिला ही घोर प्रतिज्ञा ऐकून मोठा हर्ष झाला. इकडे **सहदेव** ह्मणाला, "दादा, तुह्माला राग येतो तसाच **युधिष्ठिर** महाराजांसही आला आहे, व त्यांणीं संधि करण्याच्या निमित्तानें **दुर्योधनास** जो निरोप पाठविला आहे त्यांतील आशय तसाच आहे. त्यांणीं पांच गांव मागितले त्यांत **इंद्रप्रस्थ, वृकप्रस्थ, जयंत** आणि **वारणावत** या चार गांवांचीं नांवें घेतलीं, येणेंकरून त्या दुष्टांनीं कपटद्यूत खेळून आमचें सर्वस्व हरण केलें व आह्मांस वनवास भोगावयास

लाविलें, विषभोजन घालून आह्मांस मारण्याचा प्रयत्न केला, लाक्षागृहांत कोंडून जाळण्याचा बेत केला व भरसभेंत **द्रौपदी**चा आमच्यादेखत अपमान केला या गोष्टींचें त्याला स्मरण देऊन पांचवा ग्राम कांहीं तरी द्यावा असें जें ह्मटलें त्यांत संग्राम द्यावा असें सुचविलें आहे. व या योगानें ज्यापासून सर्व कुलाचा क्षय होणार असा समर करण्याविषयीं आमचा दुराग्रह नाहीं असें बाह्यात्कारें मात्र सुचवून अंतर्यामीं तू संधि करण्यास योग्य नाहींस ह्मणून तुजबरोबर संग्राम करण्यास आह्मी तयार आहों असें जाणविलें आहे." हें ऐकून **भीमसेन** ह्मणाला "अरे, अशा पोकळ निरोपांत काय अर्थ आहे ? ज्यावेळेस आह्मी वनवासास जाण्यास सिद्ध झालों त्याचवेळेस **कौरव**कुलाचा निःपात करण्याची प्रतिज्ञा आह्मीं सर्वांनीं मिळून केली आहे, असें असून आतां शत्रुकुलक्षय केला असतां लोक **दूषण**

देतील या लज्जेनें भिऊन जाऊन भिकाऱ्यासारखें त्यांच्याजवळ पांच गांव तरी द्या, असें ह्मणून तोंड वेंगडावें हा केवढा नामर्दपणा ! तुह्मी लोक-लज्जेस भितां; पण मूर्खांनो, भरसभेंत आपल्या बायकोला केश धरून फरफरां ओढीत आणिलें याची लाज तुह्मांस कांहींच वाटत नाहीं काय?" **भीमसेनाचें** हें आवेशयुक्त भाषण **द्रौपदी** ऐकत होतीच. ती जवळ येऊन ह्मणाली, "प्राणनाथ, नाहीं हो नाहीं ! आपणावांचून कोणालाही त्या अपमानाची लाज वाटत नाहीं हेंच खरें. आपण मात्र तो विसरून जाऊं नका ह्मणजे झालें." तिला पाहातांच **भीमसेनास** गंहिवर आला आणि प्रेमयुक्त दृष्टीनें तिजकडे पाहून तो ह्मणाला, "प्रिये, मी क्रोधांध झाल्यामुळें तू मला दिसली नाहींस ह्मणून मजवर रागावूं नको, मला क्षमा कर." **द्रौपदी** ह्मणाली, प्राणनाथ, आपण स्वस्थ बसलां असतां तर मात्र मला राग आला

असता खरा; पण आपणाला रागावलेले पाहून मला मोठा धीर येत आहे." नंतर त्यानें तिला हातानें धरून आपल्याजवळ बसविलें आणि तिच्या तोंडाकडे पाहून ह्मणाला, "प्रिये, तू आज अशी उद्विग्न कां बरें दिसत आहेस? अथवा तुझ्या उद्वेगाचें कारण तूच सांगितलें पाहिजे असें नाहीं. तें या तुझ्या विसकटलेल्या केशांवरून स्पष्ट कळतच आहे. शिव शिव! **पांडु**पुत्र जिवंत आणि सन्निध असतां या पांचालतनयेनें अशी दशा भोगावी काय? केवढें हें दुर्दैव! प्रिये, मला रागावलेला पाहून तुला आज मोठा धीर आला आहे असें तू ह्मणतेस हें खोटें नव्हे. आज तुझीं सर्व दुःखें लयास गेलीं असें समजून स्वस्थ राहा." इतक्यांत **बुद्धिमतिका** पुढें होऊन ह्मणाली, "महाराज, आज बाईसाहेबांस विशेष दुःख होण्यास कांहीं कारण झालें, तें असें कीं, आज **सुभद्रा** आदिकरून

सपत्नीसहवर्तमान बाईसाहेब **गांधारी**च्या भेटी-करितां गेल्या होत्या, तेथून परत येतांना **भानुमतीनें**[1] यांच्याकडे पाहिलें आणि मोठ्या दिमाखानें हंसून ह्मटलें, 'अग **याज्ञसेनि**[2], तुझे नवरे पांच गांव मागत आहेत ते मिळाले ह्मणजे तुमची पोटापाण्याची बेगमी होईलच. मग अजून तू आपले केश कां बरें बांधीत नाहींस?' हें काळजाला झोंबणारें भाषण ऐकून बाईसाहेबांना फार वाईट वाटलें. मग त्यांना त्या हलकट बायकोच्या तोंडीं लागूं न देतां मींच ह्मटलें, "अहो **भानुमती**बाई, तुमचे केश मोकळे केल्यावांचून आपले केश बांधावयाचे नाहींत असा आमच्या बाईसाहेबांनीं नेम केला आहे समजलां." हा समयोचित व समर्पक जबाब ऐकून **भीमसेन** **बुद्धिमतिके**वर फार संतुष्ट झाला आणि अंगाव-

---

१ **दुर्योधना**ची स्त्री. २ यज्ञवेदीपासून निर्माण झाल्यामुळें **द्रौपदी**ला **याज्ञसेनी** ह्मणतात.

रील अलंकार काढून त्यानें तिला ते बक्षीस दिले. **भानुमती द्रौपदी**ला लावून बोलली हें ऐकून त्याच्या अंगाचा तिळपापड झाला आणि तो **सहदेवाकडे** पाहून ह्मणाला, "**सहदेवा**, ऐकिलेंना हें मर्मभेदक भाषण?" **सहदेव** ह्मणाला, "दादा, जाऊं द्या हो. किती झालें तरी दुर्योधनाची बायको. विषारी वृक्षावर वाढलेली वेल जातीनें मधुर असली तथापि संगतीच्या योगानें मादक होते त्याप्रमाणेंच दुष्ट नवऱ्यांच्या सहवासानें स्त्रियाही दुष्ट होतात." नंतर **भीमसेन** उभा राहून **द्रौपदी**कडे पाहून मोठ्या क्रोधावेशानें हातांतील गदा गरगर फिरवीत ह्मणाला, "अग पांचालि, तू स्वस्थ ऐस. कांहीं काळजी करूं नको. मी प्रतिज्ञा करितों कीं, थोडक्याच काळानें ह्या माझ्या प्रचंड गदेच्या प्रहारानें त्या दुष्ट **दुर्योधना**च्या मांडीचा चुराडा करून त्यांतील रक्तानें भरलेल्या हातांनीं तुझी वेणी घालीन."

परमात्मा **श्रीकृष्ण कौरवां**कडे संधि करण्यासाठीं गेले होते, तिकडे असें वर्तमान घडलें कीं, **पांडवांना** त्यांच्या राज्याचा विभाग द्यावा असें त्यांणीं बोलणें लाविलें; परंतु **दुर्योधन** तें कबूल करीना. शेवटीं पांच गांव पांचांजणांस तरी द्यावे असें दीनपणाचें मागणें केलें. त्यावरून **पांडव** आपणास भ्याले असें जाणून युद्ध केल्यावांचून सुईच्या अग्रावर राहणारी मृत्तिका देखील त्यांस मिळावयाची नाहीं असा **दुर्योधनानें** खडखडीत जबाब दिला, व संधि करावयास आलेल्या **श्रीकृष्णास पांडवांचा** पक्षपाती ह्मणून बंदीवान करून टाकावें असा त्याणें घाट घातला. **श्रीकृष्णांनीं** तें कपट अंतर्यामीं जाणून एकाएकीं आपलें विराट स्वरूप प्रकट केलें, तें पाहतांच सर्व **कौरव** भयभीत होऊन मूर्च्छित झाले आणि परमात्मा **श्रीकृष्ण** तेथून **धर्मराजा**कडे परत यावयास निघाले. त्यावेळेस,

समुद्रमंथनसमयीं **मंदराचळाच्या** गरगर फिरण्यानें समुद्राचें पाणी ढवळून जाऊन जसा भयंकर शब्द झाला अथवा प्रलयकालचे मेघ एकमेकांवर आपटून जसा गडगडाट होतो त्याप्रमाणें दुंदुभींचा गंभीर शब्द होऊं लागला. **भीमसेनाच्या** कानीं तो शब्द पडतांच कशाची गडबड आहे ह्मणून तो विचारपूस करूं लागला; इतक्यांत **धर्मराजाचा** चोबदार धांवत धांवत तेथें येऊन त्याणें **कौरवांकडील** झालेली सर्व हकीकत **भीमसेनास** कळविली व तुह्मांस **धर्मराजांनीं** बोलाविलें आहे ह्मणून सांगितलें. **श्रीकृष्णाच्या** मध्यस्थीचा झालेला परिणाम ऐकून **भीमसेनास** मोठें आश्चर्य वाटलें आणि तो ह्मणाला, "काय या **दुर्योधनाच्या** दुष्टपणास ह्मणावें! हा दुरात्मा साक्षात् परमेश्वराला न ओळखून त्याला बद्ध करावयास् पाहातो ! केवढें हें धाष्टर्य आणि काय हा उद्धटपणा! मूर्खा

कुरुकुलाधमा, भोग आतां आपल्या कर्माचें फळ. तुझ्या नाशाला आमचा क्रोध उगीच निमित्त-मात्र होणार. सत्वनिष्ठ असे मुमुक्षुजन निर्वि-कल्प समाधि लावून तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें ज्या सत्वरूप पुराणपुरुष परमात्म्याला पाहातात त्याची तुला मोहांधाला आणि मूढमतीला ओ-ळख कशी पटणार? धिक्कार असो तुला!" नंतर त्याणें **धर्मराज** पुढें काय करणार असें चोबदारास विचारिलें, तेव्हां तो ह्मणाला, "म-हाराज, आपण स्वतः तिकडे गेलां ह्मणजे काय तें सर्व समजेल.

**कौरव** कोणत्याही प्रकारें संधि करण्यास कबूल नाहींत असें समजतांच **पांडवांनीं** युद्धाची तयारी केली. त्यांच्याकडील **द्रुपद, विराट, वृष्ण्यंधक, सहदेव** आदिकरून सेनानायक एकत्र झाले, तसेच कौरवपक्षाकडील सहस्रशः योद्धे आपापल्या सैन्यांसह **दुर्योधनास** येऊन

मिळाले. द्यूतरूप अरणींच्या मंथनापासून उत्पन्न झालेला **युधिष्ठिराचा** क्रोधाग्नि **द्रौपदीच्या** केशांबरकर्षणरूप वायूनें प्रज्वलित झाला होता; तथापि त्या सत्वधीर व क्षमाशील पुरुषानें कुरुकुलाचा नाश न व्हावा व आपणास सत्यवचनभंगाचा दोष न लागावा ह्मणून आजपर्यंत कसा तरी मोठ्या प्रयत्नानें तो भडकूं दिला नाहीं; पण अखेरीस तोच क्रोधाग्नि अनावर होऊन कुरुकुलवनाची राखरांगोळी करण्यासाठींच कीं काय आपलीं ज्वालारूप अनंत मुखें पसरून सिद्ध झाला असें वाटूं लागलें. तिकडे **भीष्माचार्य, द्रोणाचार्य, अश्वत्थामा, कर्ण** इत्यादि महापराक्रमी योद्धे **कौरवांचें** सहाय करण्यास तयार झाले. याप्रमाणें उभयपक्षांची कडेकोट तयारी होतांच दोन्ही सैन्यांमध्यें प्रलयकालच्या मेघगर्जनेप्रमाणें गंभीर आणि भयंकर असा समरदुंदुभीचा शब्द होऊं लागला.

तो शब्द ऐकून **द्रौपदी** घाबरली आणि हा काय अनर्थ आहे ह्मणून **भीमसेनास** विचारूं लागली. तेव्हां तो ह्मणाला, "प्रिये, विचारितेस काय? हा रणयज्ञ सुरू झाला आहे समजलीस? या यज्ञामध्यें आह्मी चौघे बंधु ऋत्विज, धर्मराज मुख्य यज्ञ करणारा दीक्षित, **श्रीकृष्ण** भगवान् यज्ञ चालविणारे आचार्य आणि **कौरव** हे या यज्ञांत वध करण्यासाठीं धरून आणिलेले पशु होत. हा जो दुंदुभीचा शब्द ऐकूं येत आहे तो पृथ्वीवरील सर्व राजांस या यज्ञाला येण्याचें निमंत्रण करीत आहे. आतां या यज्ञाचा हेतु व फल काय ह्मणून विचारशील तर ज्या दुष्टांनीं तुला गांजिलें त्यांचा वध करावयाचा व तू जें मुक्तकेशव्रत धरून आजपर्यंत कष्ट भोगीत बसली आहेस त्याचें उद्यापन करावयाचें." याप्रमाणें बोलून "आतां मी या यज्ञानें कुरुकुलाचा विध्वंस करावयास जातों, तू स्वस्थ राहा,

असें सांगून **भीमसेन** तेथून जाऊं लागला. तेव्हां डोळ्यांस पाणी आणून **द्रौपदी** ह्मणाली, "प्राणनाथ, दैत्यांशीं युद्ध करणाऱ्या **श्रीविष्णूला** जसा जय मिळाला तसा तुह्मांसही मिळो." इतक्यांत **बुद्धिमतिका** जवळच होती ती ह्मणाली, "महाराज, आपण समरांत विजयी होऊन बाईसाहेबांना सुखी करावें एवढेंच त्यांचें मागणें आहे." **भीमसेन** ह्मणाला, "प्रिये, सांगतों ऐक. तुझी त्या दुष्टांनीं जी विटंबना व जो अपमान केला त्या योगानें तू तर दुःखी आहेसच; पण मलाही इतकें दुःख होत आहे व लज्जा वाटत आहे कीं, इतःपर हें भूमंडळ निःकौरव केल्यावांचून तुला तोंडच दाखवावयाचें नाहीं." **द्रौपदी** ह्मणाली, "प्राणनाथ, माझ्या अपमानानें आपला क्रोधानल पेटला आहे हें योग्यच आहे; तथापि समरामध्यें आपल्या शरीराकडे न पाहतां भलतें सलतें साहस करूं नका एवढें माझें मागणें आहे;

कारण शत्रुसैन्य फारच मोठें व पराक्रमी आहे असें ऐकितें; तेव्हां त्यांत मोठ्या सावधपणानें राहिलें तरच यशाची आशा आहे." **भीमसेन** ह्मणाला, "अग सुक्षत्रिये, अशा सैन्यामध्यें संचार करण्यास आह्मांस कशाचें भय आहे? अग, ज्या रणांगणामध्यें गजांचे मस्तक एकमेकांवर आपटून जिकडे तिकडे रक्तमांसाचा चिखल झाला आहे व त्यामध्यें रुतून जाणाऱ्या रथांवर चढून वीर पुरुष नानाप्रकारचें युद्धकौशल्य दाखवीत आहेत व जेथील रक्त प्राशन करून व मांस भक्षण करून कोल्हे भयंकर शब्द करीत असतां त्या शब्दाला रणवाद्य वाजत आहे असें समजून मरण पावलेल्या वीरांचीं कबंधें थयथय नाचावयास लागतात अशा संग्रामरूप प्रलयार्णवामध्यें निर्भयपणें तरून जाण्याविषयीं समर्थ असे या पृथ्वीच्या पाठीवर पांडुपुत्रांवांचून कोणीही नाहींत." असें ह्मणून **सहदेवा**-

सहवर्तमान तो तेथून निघून चालता झाला.

**दुर्योधना**बरोबर संधि होऊं नये असें **भीमसेना**च्या मनांत होतेंच व **श्रीकृष्णा**च्या मध्यस्थीचा तसाच परिणाम झाला, तेव्हां **कौरवां**बरोबर युद्ध करण्याचा अर्थातच **पांडवां**चा निश्चय होऊन उभयपक्षांनीं आपापलीं सैन्यें जमा केलीं व मोठा रणसंग्राम सुरू झाला. त्यांत उभय पक्षांतील वीरांनीं मोठे पराक्रम केले व लक्षावधि वीर समरभूमीवर पतन पावले. त्यांत **दुर्योधना**चे बहुतेक भ्राते मरण पावले. **पांडवां**कडील **अर्जुनाचा** पुत्र **अभिमन्यु** वयानें लहान असून मोठा पराक्रमी होता तो एके समयीं एकटाच युद्ध करीत असतां कपटानें व्यूहामध्यें कोंडून **द्रोण, कर्ण, जयद्रथ** इत्यादि महावीरांनीं मिळून त्याचा वध केला; यामुळें पांडवसैन्यांत जिकडे तिकडे हाहाकार होऊन कौरवसैन्यांत मोठा आनंदोत्सव सुरू झाला. त्या आनंदाच्या

भरांत **भानुमती** सहवर्तमान विलाससुख भोगण्याच्या इच्छेनें ती कोठें आहे याची चौकशी करण्याकरितां **दुर्योधनानें** आपल्या **विनयंधर** चोबदारास पाठविलें. तो शोध करीत चालला असतां आपणाशीं ह्मणूं लागला, "हर हर! काय माझी स्थिति ही! मी आतां ह्मातारा झालों. माझ्यानें कामकाज करवत नाहीं, तेव्हां कांहीं तरी चाकरी ध्यावी ह्मणून या निर्दय यजमानानें मला आपल्या जनानखान्यावर द्वारपाळ करून ठेविलें आहे; तस्मात् धिक्कार असो या ह्मातारपणाला! पण नव्हे; ह्मातारपणाला कां दोष लावावा? ही अन्तःपुरांतील चाकरीच हलकटपणाची आहे. पाहा कीं, एथें डोळे असून वर पाहातां कामा नये. कान असून कांहीं ऐकतां कामा नये. चालण्यास शक्ति असली तरी हातांत काठी धरून चाललें पाहिजे. आपल्या हातून कांहीं चुकी घडेल कीं काय ह्मणून स-

वेदा धास्ती बाळगिली पाहिजे. अंमळ कोणाला अरे ह्मणून बोलतां उपयोगीं नाहीं. तेव्हां हा सेवाधर्मच बेटा अत्यंत नीच होय. ह्मातारपणाकडे कांहीं दोष नाहीं." याप्रमाणें विचार करीत चालला असतां त्याला एक दासी भेटली. तिला **भानुमती** कोठें आहे ह्मणून विचारितां तिणें सांगितलें कीं, **गांधारी** सासूबाईचें पादवंदन करून महाराजांना समरांगणांत जय यावा ह्मणून कांहीं व्रत धरून देवाची आराधना करीत **चिमण**बागेंतील देवालयांत ती बसली आहे. हें ऐकतांच **विनयंधर** ह्मणाला, "शाबास! पतिव्रते शाबास! नाहीं तर आमचे महाराज! ज्यांना साक्षात् **वासुदेव** सहाय आहे अशा पांडुपुत्रांशीं प्रसंग असतांही यांना अन्तःपुरांतील विलास अद्यापि सोडीत नाहींत. पण असें करणें कांहीं चांगलें नव्हे; कारण क्षत्रियकुलांचा नाश करतांना ज्याच्या परशूस कधीं को-

ठेंही प्रतिबंध झाला नाहीं त्या **परशुरामा**सही ज्याणें जिंकिलें अशा त्या महापराक्रमी **भी-ष्मास पांडवांनीं** युद्धांत जर्जर करून शरश-य्येवर उताणें पाडिलें त्याचें यांना कांहींच दुःख वाटत नाहीं, आणि विजय संपादून श्रांत झा-लेल्या त्या **अभिमन्यु**बाळाचा अनेक धनुर्धर योद्ध्यांनीं एकत्र होऊन तो एकटा व निःशस्त्र असतां वध केला या गोष्टीचा यांना मोठा आ-नंद वाटत आहे ! असो आमची आतां धडगत दिसत नाहीं. परमेश्वर काय करील तें खरें." असें म्हणून **दुर्योधनाला भानुमती** बागेंत बसली आहे असें कळविण्यासाठीं तो परत राजवाड्या-कडे निघून गेला.

इकडे **भानुमती** आपल्या सख्या **सुवदना** आणि **तरलिका** यांना घेऊन देवालयांत बसली होती. तिनें आदल्या रात्रीं स्वप्नांत असें पा-हिलें होतें कीं, ती **प्रमदवनांत** बसली असतां

एक नेकुल तेथें आला आणि त्याणें शंभर सर्प मारिले. हें स्वप्न अनिष्टसूचक आहे असें जाणून ती फार खिन्न झाली होती. **सुवदनेनें** तिला खिन्न होण्याचें कारण विचारिल्यावर तिनें झालेली हकीकत सर्व सांगितली, तेव्हां ती ह्मणाली, "अग **भानुमति, दुर्योधन**महाराजांची तू पट्टराणी असून एवढ्याशा स्वप्नानें इतकी घाबरून गेलीस तेव्हां तुला ह्मणावें काय? मनुष्य झोंपीं गेलें ह्मणजे त्याला भलभलतीं स्वप्नें पडतातच. पण त्यांत काय अर्थ आहे? तथापि तुला जर त्यांत कांहीं अनिष्ट वाटत असेल तर कांहीं काळजी करूं नको; आह्मी देवतांची आराधना करून त्याचा परिहार करूं." हें भाषण होत आहे इतक्यांत **दुर्योधन** चोबदारासहवर्तमान त्याठिकाणीं येऊन पोंचला. **अभिमन्यूच्या** वधानें त्याला अगोदर मोठा आनंद झालाच होता;

---

१ मुंगुस. पांडवांपैकीं चौथ्याचें नांवही नकुल होतें.

तथापि त्या एकव्या व निःशस्त्र बालकाचा अनेक वीरांनीं मिळून कपटानें वध केला ही गोष्ट अत्यंत लज्जास्पद असल्यामुळें त्याच्या जीवास फार खात होती. असें होतें तरी बाह्यात्कारें तो ह्मणाला, "अपकार करणाऱ्या शत्रूचा—मग तो लहान असो वा मोठा असो—गुप्तपणानें किंवा उघडपणानें कसाही सूड उगविला तरी तो अधर्म होत नाहीं व याच न्यायानें आज **द्रोण, कर्ण, जयद्रथादि** महायोद्ध्यांनीं त्या पोराचा वध केला येणेंकरून मला संतोषच वाटत आहे." हें भाषण ऐकून **विनयंधर** ह्मणाला, "महाराज, शस्त्ररहित एकव्या वीरावर अनेकांनीं घाव घालणें यांत काय पुरुषार्थ ?" **दुर्योधन** ह्मणाला, "अरे, त्या पांडुपुत्रांनीं द्रुपदपुत्र **शिखंडी** याला पुढें करून **भीष्माचार्यांस** कपटानें मारिलें त्यांत त्यांचा जो पुरुषार्थ तोच आमचा. आणि या प्रमाणेंच इष्टमित्र, बंधु, पुत्र, भ्राते यांसहवर्त-

मान पांडुपुत्र **सुयोधना**चा[1] लवकरच घात करील हें पक्कें समज. छे छे! भलतेंच मी काय बोललों? **सुयोधन** पांडुपुत्रांचा घात करील असें ह्मणावयाचें तें उलटेंच तोंडांतून निघून गेलें! गड्या **विनयंधरा**, खरेंच सांगतों, **भानुमती** नित्यनियमाला सोडून मला कळविल्यावांचून मोठ्या पाहांटेसच मंदिरांतून निघून गेली, यामुळें माझें चित्त ठिकाणावर नाहीं ह्मणून बोलण्यांत असा विपर्यास झाला, असो. चल तर आतां मला ती प्रिया कोठें आहे ती लवकर दाखीव."

**विनयंधर दुर्योधनाला भानुमतीकडे** घेऊन चालला असतां जिकडे तिकडे बागेंतील पुष्पांचा सुवास सुटला होता, तो घेत घेत उभयतां चालले असतां **विनयंधर** ह्मणाला, "महाराज, या प्रभातकाळीं या बागेची शोभा किती ह्मणून वर्णन करावी! थंडगार वायूच्या योगानें निर्गुंडी-

---

१ **दुर्योधनाला सुयोधन** असेंही ह्मणत असत.

च्या वेली आनंदानें जणूं काय डोलत आहेत व त्या योगानें त्यांजवरील पुष्पें डेंखांपासून सुटून त्यांचा भूपृष्ठावर जिकडे तिकडे खच झाला आहे. मुग्धवधूंच्या गालांवर जशी गुलाबी कांति झळकत असते त्याप्रमाणें कांतिमान् पुष्पांनीं नानाप्रकारच्या लता चोहोंकडे प्रफुल्लित झाल्यामुळें उद्यानदेवतेच्या कपोलांप्रमाणें त्या शोभिवंत दिसत आहेत. कुंदपुष्पांचा घमघमाट चोहोंकडे सुटून त्याच्या योगानें वायु सुगंधित आणि शीतल झाला आहे. आणखी इकडे पाहा, काय मौज दिसत आहे ती! ज्यांच्या उदरांतील मकरंदामध्यें थंडगार हिमाचे बिंदु पडले आहेत अशीं रात्रीं विकसित झालेलीं पुष्पें या समयीं खालीं गळून पडतांच त्यांच्या बरोबर त्यांच्या आश्रयास राहिलेल्या भ्रमरांचेंही पतन होत आहे व ते भ्रमर तेथून उडून सुवासानें सूचित केलेल्या मार्गानें जाऊन सूर्यकिरणांनीं प्र-

फुल्लित होऊं लागणाऱ्या कमलांवर बसत आहे-
त." **दुर्योधन** ही सर्व मौज पाहून ह्मणाला,
"खरेंच, आणखी एक पाहा या प्रभातसमयीं क-
सा चमत्कार दिसत आहे तो! हे बेटे भ्रमर
आह्मां राजे लोकांप्रमाणेंच मिजासी झाले आहेत.
राजांच्या शय्यामंदिरांत प्रातःकाळीं त्यांचे सेव-
क जाऊन त्यांना हातानें हालवून जागें करतात
त्याप्रमाणें सूर्योदयीं विकास पावणाऱ्या कमलां-
तील शय्येवर रात्रौ सुगंधित परागांत स्त्रियांस-
हवर्तमान लोळत क्रीडा करणारे हे भ्रमर सूर्याच्या
करांनींच जणूं काय हालविल्यामुळें जागे होऊन
आपलीं कमलगर्भांतील शय्यास्थानें सोडून बाहेर प-
डत आहेत." याप्रमाणें उद्यानशोभा पाहात पाहात
ते उभयतां, **भानुमती** आपल्या मैत्रिणींसहवर्त-
मान देवताराधना करीत बसली होती तेथें आले.
राजाला **भानुमती** फार खिन्न झालेली दिसली
व ती न विचारितां मोठ्या पहांटेस निघून आली

यावरून ती आपणावर रागावली असावी असें त्यास वाटलें. नंतर त्यानें आपला युद्धाचा रथ सिद्ध करून ठेवण्याच्या निमित्तानें **विनयंधरा**-ला तेथून जाण्यास सांगितलें. तो गेल्यावर **भा-नुमतीस** उद्देशून आपणाशींच ह्मणतो, "आज ही प्रिया मजवर इतकी कां बरें रागावली? म-जपासून असा इचा काय बरें अपराध झाला? रात्रीं इणें आपल्या भुजलतापाशांनीं मला जें दृढबंधन केलें होतें तें निद्रेच्या भरांत शिथिल झाल्यावर मी इजकडे पाठ करून निजलों ह्मणू-न रागावली, किंवा स्वप्नांत कोणा अन्य स्त्रीशीं भाषण करतांना इणें मला पाहिलें, झालें तरी काय? मी इच्या वचनाबाहेर यत्किंचित्‌ही वा-गत नसतां मजवर इतका रुसवा कां बरें व्हावा?" पुनः विचार करून ह्मणाला, "अथवा कदाचित् असेंही असेल कीं, आमचें परस्परांवर जें निःसीम प्रेम आहे त्या योगानें बळेंच कांहीं तरी अपरा-

ध मीं केला, अशी कल्पना करून माझ्याशीं विनोदानें प्रेमकलह करावा अशा हेतूनें तर ही रुसून बसली नसेल ना? काय असेल तें असो. कांहींच कळत नाहीं. आतां आपण एथेंच कोठें तरी दडून बसावें ह्मणजे ही आपल्या सखीबरोबर बोलत आहे त्यावरून कांहीं तरी खुलासा होईल." असें ह्मणून तो तेथें एका लतेच्या आड कानोसा घेत उभा राहिला. इकडे **सुवदनेनें** तिला विचारिलें, "बरें, मग पुढें काय झालें." ती ह्मणाली, "त्या **नकुलाचें** तें सुंदर रूप पाहून मला कसेंसेंच होऊं लागलें; ह्मणून मी त्वरेनें तेथून उठून लतामंडपांत येऊन बसलें तों तोही माझ्या मागोमाग तेथें आला, आणि निःशंकपणें माझ्या स्तनांवरचा पदर त्याणें ओढिला." ही गोष्ट ऐकून **दुर्योधनाच्या** मनाची जी स्थिति झाली ती सांगतां

१ पूर्वी सांगितलेल्या स्वप्नाच्या पुढें.

पुरवत नाहीं. एकदम त्याच्या अन्तःकरणांत क्रोध, विषाद आणि आश्चर्य हे विकार उत्पन्न होऊन तो चकित झाला आणि आपणाशीं ह्मणतो, “ काय ! त्या माद्रीसुत **नकुलाचें** सौंदर्य पाहून ही त्याला लुब्ध झाली आणि माझ्याशीं अशी प्रतारणा करीत आहे काय ? आणि ह्मणूनच इतक्या पहांटेस अशा एकांत स्थळीं येऊन मैत्रिणीबरोबर गुजगोष्टी करीत बसावयाचें ! ” नंतर आपणास दोष देऊन ह्मणाला, “ मूढा **दुर्योधना,** तू काममोहित होऊन या जारिणीचें हृदय न जाणतां इतके दिवस स्वस्थ कसा राहिलास ? अरे, ही जारिणी तुझ्याशीं अशी बेइमानपणें वागत असतां इच्या संगतीनें तू आपणास धन्य मानतोस, केवढा हा मूर्खपणा ! ” नंतर तिला उद्देशून ह्मणाला, “ हे पापिष्ठे जारिणी, माझ्याशीं तू इतकी मर्यादेनें आणि विनयानें वागत असतां असें साहस तुझ्या

हातून घडावें हें केवढें आश्चर्य! निर्लज्जे, निरंतर माझ्यावर कपटप्रेम ठेवून आंतून तूं असें पापकर्म केलें आणि तुझ्याशीं मी सरळ स्वभावानें व खऱ्या प्रीतीनें वागत असतां माझ्याशीं असें कपट करून परपुरुषासक्त झालीस येणेंकरून तू आपल्या शुद्ध कुलाला केवढा कलंक लावून घेतलास! अगे पापिष्ठे, मजसहवर्तमान नानाप्रकारचे विलास भोगून तत्संबंधीं गोष्टी आपल्या मैत्रिणींना सांगत ज्या एकांत स्थळीं तू बसत होतीस त्याच पवित्र स्थळीं अशा या दुर्वर्तनास प्रवृत्त होतांना तुला लाज कशी वाटली नाहीं! असो, आतां परस्त्रीचा अपहार करणारा जो माद्रीचा कार्टा **नकुल** त्याचा जाऊन प्राण घेतों, अथवा प्रथम या जारिणीचें कांडात काढावें हेंच बरें." असा विचार करून पुढें सरसावणार इतक्यांत, "पुढें काय झालें" असें **सुवदनेनें** विचारिलें. तेव्हां **भानुमती** ह्मणा-

ली, " त्याणें माझ्या स्तनांवरील पदर ओढतांच प्राणनाथांच्या प्रातःकाळच्या मंगलवाद्यांचा आणि वारांगनांच्या सुस्वर गायनाचा शब्द ऐकून मी जागीं झालें." हें ऐकतांच **दुर्योधन** मनांत ह्मणाला, "काय! मी जागी झालें ह्मणते! यावरून इणें सांगितलेली गोष्ट स्वप्नांतील होय असें उघड होतें; तथापि पुढें या काय बोलतात तें ऐकावें ह्मणून तो तसाच स्तब्ध राहिला. तेव्हां **सुवदना** ह्मणाली, "गडे, हें स्वप्न कांहींसें अशुभसूचक आहे खरें; तथापि तूं कांहीं काळजी करूं नको. **भागीरथी** आदिकरून पवित्र तीर्थांच्या स्पर्शानें, ब्राह्मणांच्या आशीर्वादानें व होमहवनानें त्याचें निवारण करतां येईल. चांगल्या चांगल्या शहाण्यांच्या तोंडून मीं ऐकिलें आहे कीं, स्वप्नांत नकुलादि दुष्ट प्राण्यांचें दर्शन आणि शतसर्पवध अशा गोष्टी पाहाणें चांगलें नाहीं." हें भाषण ऐक-

तांच नकुल या नांवावरून झालेल्या भ्रांतीचें निरसन होऊन **दुर्योधना**च्या अन्तःकरणांत एकदम प्रकाश पडला आणि त्याला मोठा आनंद झाला; तथापि नांवाच्या सादृश्यावरून व मारलेल्या सर्पांच्या संख्येवरून ही गोष्ट आपणाकडे लागू होते असें जाणून तो मनांत किंचित् कचरला. इतक्यांत त्याला **अंगिरा**ऋषीचें वचन आठवलें कीं ग्रहांच्या गति आणि स्वप्नांतील गोष्टी यांचीं फलें काकतालीय न्यायानें जरी एकादे वेळेस अनुभवास आलीं तरी शहाण्यांनीं त्यांवर भरंवसा ठेवूं नये. तेव्हां तो ह्मणाला, भित्र्या मनुष्याला भिवविणारें हें स्वप्न जरी अनिष्टसूचक दिसत आहे तरी मी त्याला मुळींच जुमानीत नाहीं. स्त्रीस्वभावामुळें **भानुमती**ला वाटलेली भीति मात्र दूर केली ह्मणजे झालें. हें सर्व स्वप्न असल्यामुळें इच्या पातिव्रत्याविषयीं आतां संशय घेण्यास जागाच राहिली नाहीं;

आणि बरें झालें कीं, इचें अपुरतें भाषण ऐकून रागानें मी इच्या आंगावर धांवून जाऊन भलतेंच साहस केलें नाहीं, किंवा कांहीं दुरुत्तर बोलून इला दुखविलें नाहीं. लवकरच इणें आपली स्वप्नकथा पुरी केली, ह्मणून संशयांत पडलेलें माझें मन ताळ्यावर आलें आणि मिथ्या दोषारोपानें आज माझ्या हातून जो मोठा अनर्थ होणार होता तो सुदैवानें टळला हें फार चांगलें झालें.''

या वेळीं उदयकाळची तांबुस प्रभा नाहींशी होऊन **सूर्यनारायण** आपल्या लखलखित तेजानें क्षितिजापासून बराच वर आला होता, व तांबड्या रंगाचे त्याचे किरणसमूह लतांच्या पल्लवसंधींतून खालीं पडत असल्यामुळें तेथील भूभाग कुंकुमाचा सडा घातल्याप्रमाणें शोभिवंत दिसत होता. अशा समयीं त्या तेजोमय गोलकाची रक्तचंदनानें व रक्तपुष्पांनीं पूजा करावी असा

**भानुमतीनें** विचार करून पूजासाहित्य आण-ण्याविषयीं तिनें आपल्या दासीस सांगितलें. **भानुमती**च्याजवळ जाण्यास हा समय चांगला आहे असें मनांत आणून **दुर्योधन** पुढें जाणार, इतक्यांत दासीनें आणिलेलें पूजापात्र हातांत घेऊन व सूर्याभिमुख होऊन **भानुमती** सूर्याला ह्मणाली, "हे आकाशरूप सरोवरांत उगवणाऱ्या सहस्रदल कमला, पूर्वदिग्वधूच्या मुखाला शोभविणाऱ्या कुंकुमतिलका, सकलभुवनाला प्रकाश देणाऱ्या रत्नदीपका **नारायणा**, मी तुला नमस्कार करितें. माझ्या स्वप्नानें जें कांहीं अनिष्ट सुचविलें असेल त्याची बाधा माझ्या प्राणनाथांस किंवा त्यांच्या भ्रात्यांस कदापि न होतां तें त्यांना कल्याणप्रद होवो." असें ह्मणून तिनें सूर्याची पूजा केली. नंतर इतर देवतांची पूजा करण्याकरितां ती दासीजवळ आणखीं फुलें मागूं लागली, इतक्यांत राजानें

पुढें होऊन दासीला मागें होण्याविषयीं खूण केली आणि आपण फुलें घेऊन तीं **भानुमती**-च्या हातांत देतांना त्यांतील कांहीं फुलें बळेंच खालीं जमिनीवर पाडिलीं. हें **भानुमती**ला कळतांच राजाकडे न पाहतां "काय हा दांडगेपणा" असें ती रागानें दासीला बोलूं लागली. नंतर नीट लक्ष्य लावून पाहूं लागली तों तेथें फुलें देणारी दासी नसून स्वतः खासे स्वारीच उभी आहे असें जेव्हां तिला समजलें तेव्हां भयभीत होऊन लज्जेनें ती खालीं पाहूं लागली. राजा तिजकडे पाहून ह्मणाला, "प्रिये, रागावूं नको. अशा प्रकारच्या सेवेविषयीं हा सेवक अनभ्यस्त आहे, याला नीट संभाळून घे. तुझे हे विशाल आणि कज्जलहीन नेत्र उघडून एकवार मजकडे पहा आणि हास्ययुक्त मुखानें मजबरोबर मधुर आणि सरळ असें भाषण कर. तू सांगशील तसें करावयास हा सेवक हात जोडून

तयार आहे." **भानुमती** लाजून ह्मणाली, "प्राणनाथ, माझ्या मनांत कांहीं व्रत करावयाचें आहे तें केल्यावांचून माझ्या जिवाला जी कांहीं एक धास्ती वाटत आहे ती नाहींशी व्हावयाची नाहीं; यासाठीं आपली अनुज्ञा असावी." **दुर्योधन** ह्मणाला, "प्रिये, मी तुझा स्वप्नवृत्तांत सारा ऐकिला. तू व्रत करण्याचें मनांत आणून आपल्या सुकुमार देहाला कां बरें व्यर्थ शीण देतेस? अग, भित्रे, तू जर अशा गोष्टींची धास्ती बाळगून दुःख पावत असशील तर सकल पृथ्वीस कंपित करणाऱ्या या माझ्या प्रचंड आणि सर्वत्र पसरलेल्या सेनांचा आणि **कर्ण**, **द्रोण** इत्यादिकां सारख्या महापराक्रमी वीरांचा उपयोग काय? अग, आह्मा शंभर भावांच्या भुजरूप वनांतील छायेंत सुखानें संचार करणारी या **दुर्योधन**केसरीची तू स्त्री असून तुला कशाचें भय आहे?" **भानुमती** ह्मणाली, "प्राणनाथ,

खरेंच, आपण जवळ असतां मला भय बाळगण्याचें कांहीं कारण नाहीं. चला तर मग आपण आतां घरीं जाऊं." राजा ह्मणाला, "प्रिये, जरा थांब, या रमणीय बागेंत तुजबरोबर यथेच्छ क्रीडा करावी असें मनांत येतें आणि असें वाटतें कीं, रतिप्रसंगीं डोळे किंचित् झांकल्यामुळें ज्या मुखाची शोभा कमलकांतीलाही मागें सारिते व ज्याचें हास्य मंद असून लज्जेनें ज्यांतून स्पष्ट भाषण निघत नाहीं, तसेंच व्रताच्या निमित्तानें ज्यावर अलित्याच्या रंगानें यवचिन्ह केलेलें दिसत नाहीं, अशा या तुझ्या सुंदर मुखाचें, या समयीं तू व्रतस्थ असतांही यथेच्छ चुंबन करावें." याप्रमाणें तीं उभयतां स्त्रीपुरुषें प्रेमाच्या ऐन भरांत आलीं असतां अकस्मात् प्रलयवाताप्रमाणें भयंकर अशी मोठी वावटळ सुटली, व ती इतकी सोसाट्यानें वाहूं लागली कीं, तिच्या योगानें मेघगर्जनेप्रमाणें भयंकर शब्द होऊन

मोठमोठे वृक्ष मुळासकट उपळून धडाधड पडूं लागले व त्यांच्या शाखा दशदिशांकडे वेगानें उडूं लागल्या. वृक्षपतनाच्या योगानें खासपागेंतील घोडे चोहोंकडे उधळत सुटले व त्यामुळें रस्त्यांतून फिरण्याची कोणाची छाती होईना. वृक्षांच्या खांद्यांचें एकमेकींवर घर्षण होत असल्यामुळें अग्नि उत्पन्न होऊन त्यापासून निघालेला धूर घरादारांत शिरूं लागला. वाऱ्याच्या सोसाट्यानें धुळीचे लोटचे लोट वर आकाशांत उडून जाऊन स्तंभाकार दिसूं लागले व रस्त्यांतून चालणाऱ्या लोकांच्या डोळ्यांत धुळीचे कण शिरून त्यांस दिसेनासें झालें. याप्रमाणें एकाएकीं मोठा अनर्थापात झाल्यामुळें **भानुमती**चा भयानें थरकांप झाला आणि तिनें **दुर्योधना**च्या गळ्यास घट्ट मिठी मारिली, आणि मला संभाळा, संभाळा ह्मणून मोठ्यानें ओरडली. तेव्हां **दुर्योधन** तिला कंवटाळून ह्मणाला, "प्रिये, घाबरूं नको. हा वा-

रा सुटला आहे, दुसरें कांहीं नाहीं. लवकरच शांत होईल. तुला यापासून त्रास झाला; पण यानें मजवर मोठाच उपकार केला ह्मणावयाचा. कारण पाहा कीं, तू व्रतस्थ असल्यामुळें, जर मीं तुला स्पर्श केला असता तर भिवया वर चढवून मजकडे तूं रागानें पाहिलें असतें किंवा डोळ्यांतून गंगायमुना काढिल्या असत्या, किंवा तोंड एकीकडे फिरविलें असतें. मला घालवून देण्यासाठीं नानाप्रकार केले असते; पण आतां पाहा या वावटळीला भिऊन आपण होऊनच पयोधरांचा भंग होईल अशी घट्ट मिठी माझ्या गळ्याला मारून कशी बसली आहेस ती! अहाहा! किती सुखकर हें आलिंगन वाटत आहे!" असें ह्मणून जवळच एक क्रीडामंदिर होतें तिकडे जावयास तीं सर्वजण तेथून निघालीं. तें स्थान चोहोंकडून आच्छादित असल्यामुळें तेथें वाऱ्याचा उपद्रव फारसा होत नव्हता. जातांना वा-

टेंत तिला भय वाटूं नये व अडखळून पडूं नये ह्मणून राजानें तिला घट्ट धरिलें. तरी तिचे नेत्र विशाल असल्यामुळें तिला धुळीची बाधा विशेष होऊं लागली व उरस्थळ पीनकुचांनीं व्याप्त असल्यामुळें चालतांना तिला फार दम लागला. जघनप्रदेश पुष्ट असल्यामुळें त्याच्या भारानें मांड्या कांपूं लागल्या; तथापि तशीच हळुहळू गजगतीनें चालत चालत राजानें तिला त्या क्रीडा-मंदिरांत आणिलें. तेथें बसावयास कांहीं घातलेलें नव्हतें व राजाच्या मनांत **भानुमती**ला मांडी-वर घेऊन बसावयाचें होतें; तेव्हां ती संधि पाहून तो ह्मणाला, "प्रिये, या कठिण आणि थंड-गार शिलातलावर तुला कसें बसतां येईल? वाऱ्यानें तुझ्या अंगावरील वस्त्र उडत आहे अशा वेळेस तूं या माझ्या मऊ गुलगुलीत मांडीवर येऊन बसशील तर त्याचें निवारण तरी होईल व तशा स्थितींत तुला डोळे भ-

रून पाहिलें तर मला अत्यंत सुख वाटेल."

याप्रमाणें विनोद चालला असतां तिकडे समरभूमीवर **कौरवपांडवांचें** घनघोर युद्ध चाललेंच होतें त्यांत **भीमसेनानें** **दुर्योधनाच्या** रथाचा ध्वज मोडून पाडिला. हा मोठा अपशकुन झाला असें जाणून तें वर्तमान **दुर्योधनास** कळविण्याकरितां **विनयंधर** चोबदार घाबऱ्यां घाबऱ्यां त्या क्रीडामंदिरांत आला आणि "महाराज, तुमचा मोडलाहो मोडला" असें मोठ्यानें ओरडून ह्मणाला. **दुर्योधन** तें ऐकून भय पावून ह्मणाला, "अरे कोणीं काय मोडला? पुरतें सांग, असें अर्धवट काय बोलतोस." चोपदार ह्मणाला, महाराज, भीम[1] मारुतानें तुमच्या रथाचा ध्वज मोडला आणि त्याला बांधिलेल्या घुंघुरांच्या नादानें तो जणूं काय रुदन करीतच भूमीवर पतन पावला.

---

१ भीम मारुत या शब्दाचे वायुपुत्र **भीमसेन** व भयंकर वारा असे दोन अर्थ होतात.

हें दुश्चिन्ह आहे असें मला वाटल्यावरून त्याची कांहीं शांति करावी असें आपणास सुचविण्याकरितां मी धांवत धांवत आलों." राजा ह्मणाला, "अरे प्रचंड वारा सुटून त्याच्या वेगानें सर्व पृथ्वी कंपित झाली त्यांत ध्वज मोडून पडला असेल यांत नवल तें काय? आणि दुश्चिन्ह तें कसचें? पण **भानुमती**लाही तें दुश्चिन्ह कांहीं अनिष्टसूचक आहे असें वाटल्यावरून तिणें ब्राह्मणांकडून होमहवन आणि वेदघोष करवून शांति करण्याविषयीं **दुर्योधना**स आग्रह केला. तेव्हां त्याणें तिच्या संतोषाकरितां तसें करण्याविषयीं प्रधानास निरोप पाठविला. इतक्यांत **जयद्रथा**ची माता आणि **दुर्योधना**ची बहीण **दुःशीला** या उभयतां आपणास भेटावयास आल्या आहेत असें द्वारपालिकेनें येऊन कळविलें. अशा स्थळीं त्यांचें येण्याचें कारण **दुर्योधना**च्या लक्षांत येईना; तथापि त्याच्या मनांत आलें कीं,

**अभिमन्यूच्या** वधानें कुपित झालेल्या **पांडवांनीं** कांहीं तरी सूड उगविण्यासारखें कृत्य केलें असावें. नंतर त्याणें त्या दोघी जणींस आंत घेऊन येण्याविषयीं द्वारपालिकेस सांगितलें. आंत येतांच त्यांणीं डोळ्यांस पाणी आणून **दुर्योधनाच्या** पायांवर लोळण घेतली. त्यांना उठवून व सांत्वन करून **जयद्रथ** खुशाल आहे ना ? ह्मणून **दुर्योधनानें** त्याच्या आईस विचारिलें; तेव्हां ती ह्मणाली, " राजा, खुशालीची वार्ता कशास पाहिजे ? पुत्रवधामुळें संतप्त होऊन **अर्जुनानें** अशी प्रतिज्ञा केली आहे कीं, आज सूर्यास्तापूर्वी मी **जयद्रथाचा** वध करीन, आणि न केला तर अग्निप्रवेश करून प्राणत्याग करीन.'' हें भाषण ऐकून **दुर्योधनानें** किंचित् हास्य केलें, आणि ह्मणाला, " एवढ्याचसाठीं का तुह्मी रडतां ? यांत काय आहे ? पुत्रमरणानें दुःखित झालेल्या त्या **किरीटीच्या** तोंडची ही वायफळ

बडबड ऐकून तुह्मांस इतकें घाबरावयास नको. काय बायकांचा वेडेपणा हा ! बाई, उगीच कष्टी होऊं नका. ताई, तूंही रडूं नको. अग, या **दुर्योधना**चे बाहुपरिघ ज्याचें रक्षण करीत आहेत त्या महारथी **जयद्रथाचा** नाश करण्याचें **अर्जुना**च्या अंगीं कोठून सामर्थ्य असणार ?" **जयद्रथा**ची आई ह्मणाली, "राजा, तू ह्मणतोस तें खरें जरी असलें, तरी पुत्रवधामुळें ज्यांचा कोपानल धडकून गेला आहे असे ते पांडववीर आपल्या जीवाची परवा न करितां जर निकरानें लढले तर खचित मोठा अनर्थ होईल ह्मणून मला भय वाटतें." **दुर्योधन** ह्मणाला, "पुरे त्यांच्या कोपानलाचें वर्णन ! त्याचा उजेड कितीसा पडत असतो तें जगप्रसिद्ध आहेच. पाहा कीं, सर्व **पांडवां**देखतां भरसभेमध्यें माझ्या आज्ञेनें जेव्हां **दुःशासनानें** **पांचाली**ला झिंपऱ्या धरून फरफर ओढीत

आणलें व तिची ती दीनस्थिति पाहून सर्व लोक 'बिचारी गाय हो गाय!' असें बोलले त्या वेळेस त्यांचा कोप कोठें दडून बसला होता? आपल्या स्त्रीची परपुरुषां देखत अशी विटंबना होत असतां कोणत्या तरुण पतीला व विशेषें करून क्षत्रिय कुलोत्पन्न पुरुषाला राग येणार नाहीं? तेव्हां त्यांच्या रागाचा धाक बाळगण्यांत कांहीं अर्थ नाहीं. **जयद्रथा**चा वध न करीन तर अग्निकाष्ठें भक्षीन अशी जर **अर्जुनानें** प्रतिज्ञा केली असेल तर ती गोष्ट आनंदच मानण्यासारखी होय. त्याच्या हातून **जयद्रथा**चा वध झाला नाहीं—व तो होणेंही नाहीं—ह्मणजे तो प्राणत्याग करणार. मग बाकीचे **पांडव** तरी प्राण ठेवतात कशाला? तेही मरून जाणार. ठीक, फार चांगलें झालें. औषधावांचून खोकला गेला. आणखी तुह्माला सांगतों, ज्याचें संरक्षण करण्याविषयीं आह्मी शंभर भाऊ डो-

ळ्यांत तेल घालून जपत असल्यामुळें व **कृपाचार्य, द्रोणाचार्य, कर्ण, अश्वत्थामा** आदिकरून महारथी ज्याचे पाठराखे असल्यामुळें ज्याच्या अंगीं दुप्पट बळ आलें आहे अशा त्या वीराचें नुसतें नांव देखील घ्यावयास **अर्जुना**च्या किंवा दुसरे कोणाच्या अंगीं सामर्थ्य नाहीं. मग समरांगणीं उभें राहून त्याच्याशीं सामना करण्याची गोष्ट तर लांबच राहिली." हें भाषण ऐकून **भानुमती** ह्मणाली, "प्राणनाथ, आपण ह्मणतां त्या सर्व गोष्टी खऱ्या; तथापि **धनंजया**ची प्रतिज्ञा मोठ्या निर्धाराची दिसते, ह्मणून भीति बाळगण्याचें कारण." **दुर्योधन** ह्मणाला, "अग वेडे, तुला त्या **पांडवां**चा मोठा बाऊ वाटतो; पण सांगतों ऐक. **दुःशासना**च्या हृदयाचें विदारण करून त्यांतील रक्त प्राशन करण्याची आणि माझ्या मांडीचा गदेच्या प्रहारानें चुराडा करण्याची जशी त्यांची

प्रतिज्ञा तशीच ही **जयद्रथा**च्या वधाची. येथून तेथून साऱ्याच पोकळ गप्पा. त्यांत काय अर्थ आहे? मी त्यांना मुळींच जुमानीत नाहीं. आतां पाहातों तो **पार्थ** आपली मिथ्या प्रतिज्ञा कशी शेवटास नेतो तें. क्षत्रियांना धारातीर्थी मरण येणें हें पवित्र होय; पण तेंही त्याला दुर्लभ करून आज त्याला जळतीं लांकडेंच खावयास लावितों."

याप्रमाणें भाषणें झाल्यावर चोबदारास सांगून त्याणें आपला युद्धाचा रथ तयार करवून तेथें आणविला, आणि **भानुमतीस** सर्व परिवारासह आपापल्या मंदिरांकडे जाण्यास सांगून व आपण रथारूढ होऊन समरांगणाकडे चालता झाला.

या प्रसंगीं **पांडव** आणि **कौरव** यांच्यामध्यें मोठा घोर संग्राम चाललाच होता. **जयद्रथाला** मारण्याची **अर्जुनानें** प्रतिज्ञा केली होती ती त्यानें शेवटास नेली. **भीष्माचार्य** कौरव-

सेनेचें आधिपत्य स्वीकारून मोठ्या निकरानें द-हा दिवसपर्यंत एकसारखे लढत होते, त्यांनाही दहाव्या दिवशीं अर्जुनानें शरपंजरीं निजवून परलोकास पाठविलें. **भगदत्त, सिंधुराज, विराट, भूरिश्रवा, सोमदत्त, बाल्हीक** इत्यादि राजांच्या एकामागून एक त्या रणयज्ञांत आहुति पडल्या. उभय सैन्यांतील हजारों योद्धे व हत्तीघोडे शस्त्रास्त्रांनीं घायाळ होऊन त्यांच्या कलेवरांचा रणभूमीवर एकच खच होऊन गेला. त्यांच्या शरीरांतून रक्ताच्या नद्या वाहूं लागल्या व मांसाचा जिकडे तिकडे चिखल होऊन गेला. अशा त्या भयंकर स्थळीं अक्राळविक्राळ राक्षस येऊन मोठ्या आनंदानें नाचूं लागले आणि रक्त प्राशन करून व मांस भक्षण करून आपली तृषा व क्षुधा शांत करूं लागले आणि ह्मणूं लागले कीं, हें युद्ध असेंच शेंकडों वर्षें चालेल तर बरें होईल. **जयद्रथवधाच्या दिवशीं अर्जुनानें** सैन्याची

जशी कत्तल उडविली तशी जर तो दररोज उ-
डवील तर किती बाहार होईल! रक्तमांसाचीं
कोठारें भरून पुष्कळ दिवसांची आह्मास बेगमी
करण्यास सांपडेल."

**भीष्माचार्य** मरण पावल्यानंतर कौरवसेनेचें आधिपत्य गुरु **द्रोणाचार्यां**कडे आलें. त्यांनीं युद्ध इतक्या निकरानें केलें कीं, त्या योगानें पांडवसेनेची मोठी त्रेधा उडून गेली. तो वृद्ध ब्राह्मण कोणासही आटोपेना असें पाहून त्याचा नाश करण्याची **श्रीकृष्णानें धर्मराजाला** एक युक्ति सुचविली. ती अशी कीं, **मालव** देशचा राजा **इंद्रवर्मा** हा कौरवपक्षाकडून लढत असतां त्याचा **अश्वत्थामा** नांवाचा हत्ती **भीमसेनानें** मारिला; ही संधि पाहून **द्रोणाचार्यां**च्या पुत्राचें नांवही **अश्वत्थामा**च होतें, यासाठीं **अश्वत्थामा** लढाईंत मरण पावला असें वर्तमान युक्तीनें **द्रोणाचार्यां**च्या कानावर घालावें. त्या-

प्रमाणें करतांच आपला पुत्र मरण पावला असें समजून तो वृद्ध ब्राह्मण हातचें धनुष्य व शस्त्रास्त्रें खालीं ठेवून पुत्राविषयीं अत्यंत शोक करूं लागला. याप्रमाणें तो निःशस्त्र व शोकाकुल झालेला पाहून पांडवांकडील वीर **द्रुपद**राजाचा पुत्र **धृष्टद्युम्न** यानें खड्गानें त्याचा शिरच्छेद केला. त्या वेळीं प्रलयकालीं महावात सुटून त्याच्या योगानें मेघांचे जसे प्रचंड गडगडाट होतात व त्यांनीं पृथ्वी आणि आकाश कोंडून जातें त्याप्रमाणें पूर्वीं कधीं ऐकिला नाहीं असा भयंकर गोंगाट कौरवसैन्यांत होऊन गेला. **अश्वत्थाम्याला** आपला पिता मरण पावला हें वर्तमान प्रथम समजलें नव्हतें. तो हा गोंगाट ऐकतांच हातांत नागवी तरवार घेऊन जेथें तो गोंगाट होत होता तेथें आला आणि चौकशी करूं लागला, इतक्यांत त्याला वाटलें कीं, **अर्जुन, सात्यकि** किंवा **भीमसेन** या तिघांतून कोणी तरी

आपल्या तारुण्याच्या धुंदीत माझ्या पित्याची अमर्यादा करून त्याला राग आणिला असेल ह्मणून त्यानें आपला गुरुधर्म एकीकडे ठेवून स्वपराक्रमास शोभेल असें कांहीं तरी कर्म आरंभिलें असावें; कारण, ज्या अर्थी त्याणें **दुर्योधना**चा पक्ष स्वीकारिला आहे त्या अर्थी शत्रूचा नाश करून त्याला विजयी करण्यासाठीं **परशुरामा**पासून संपादिलेल्या शस्त्रास्त्रांचा प्रभाव दाखवून सर्व धनुर्धाऱ्यांच्या अग्रणीस अनुरूप असें घोर युद्ध चालविल्यांवाचून एवढा हा भयंकर कल्लोळ व्हावयाचा नाहीं, असें मनांत आणून सजल मेघाच्या कांतीप्रमाणें लखलखणारी रत्नजडित मुठीची आपली तरवार हातांत धरून पित्याचा पराक्रम पाहण्याविषयीं उतावीळ होत्साता रथाची वाट न पाहतां तसाच पादचारी जिकडे **द्रोणाचार्य** व **धृष्टद्युम्न** यांचें युद्ध होत होतें तिकडे तो जाऊं लागला. जातांना त्याचा डावा

डोळा लवला असें पाहून तो मनांत ह्मणतो, "हें काय बरें दुश्चिन्ह होत आहे ? युद्धाची वार्ता ऐकिल्याबरोबर ज्याला अत्यंत आनंद होऊन वीरश्रीचें स्फुरण यावें त्या या अश्वत्थाम्याचा हीं दुश्चिन्हें हिरमोड करूं पाहातात ! करोत बिचारीं, मी त्यांस कधीं जुमानणार नाहीं." असें ह्मणून पुढें चालला तों त्याच्या असें दृष्टीस पडलें कीं, कौरव सैन्यांतील हजारों वीर क्षात्रधर्माचा त्याग करून व अशा प्रसंगीं शूरांना योग्य जो अभिमान तो टाकून देऊन आपल्या धन्याची यत्किंचित्‌ही भीडमुरवत न धरितां गजहयादि आपलीं वाहनें सोडून देऊन भित्र्यासारखे आपल्या कुलाच्या नांवलौकिकाची पर्वा न करितां इतस्ततः धूम पळत सुटले आहेत व त्यांतच कर्णादि महारथीही समरपराङ्मुख होऊन पळ काढीत आहेत. ही स्थिति पाहून तो ह्मणाला, "अरेरे ! धिःकार असो यांना !

माझ्या ताताचें यांना पाठबळ असून यांची अशी दशा कां बरें व्हावी? काय असेल तें असो." नंतर मोठ्यानें ओरडून ह्मणाला, "अहो, कौरवसैन्यरूप समुद्राची मर्यादा राखण्याविषयीं धैर्याचे केवळ अढळ पर्वत असे तुह्मी पराक्रमी वीर असून रणभूमीस पाठ दाखवून पळत सुटलां या तुमच्या भेकडपणास आणि अविचारास ह्मणावें तरी काय? अहो, असें पळाल्यानें मृत्यु टळतो अशी तुमची समजूत असेल तर ती व्यर्थ होय; कारण प्राणिमात्रास मरण कधीं चुकावयाचें नाहीं, तें कोठेंही गेलें तरी अवश्य येणारच आहे; तेव्हां असा पळ काढून तुह्मी आपल्या निर्मल यशाला व्यर्थ कां डाग लावून घेतां? अहो, **कर्ण, कृपाचार्यादि** महावीरहो, शत्रुसैन्यरूप समुद्रास केवळ वडवाग्नीप्रमाणें व सर्व धनुर्धरांमध्यें श्रेष्ठ असा माझा पिता सेनानायक असतां व हातांत धनुष्यबाण घेऊन

सर्वांच्या अग्रभागीं लढत असतां तुह्माला भय बाळगण्याचें कारण काय ?" असें ह्मणतो आहे तों त्या पळत सुटलेल्या सैन्यापैकीं एकजण मागें फिरून ह्मणाला, "बाबा, तुझ्या पित्याचें नांव आतां कशास पाहिजे ? त्याचा अवतार केव्हांच संपला." तें ऐकून **अश्वत्थामा** रागानें ह्मणाला, "अरे भेकडा, नीचा, माझ्या ताताविषयीं असें अशुभ बोलतोस काय ? अशी बडबड करतांना तुझी जिव्हा कशी झडून पडली नाहीं ? अरे, अद्यापि द्वादशार्क उदय पावून आपल्या प्रखर तेजानें हें विश्व जाळूं लागले नाहींत, अथवा सर्व मरुद्गणांचा क्षोभ होऊन त्यांणीं दशदिशा व्याप्त केल्या नाहींत, किंवा प्रलयकालच्या मेघांनीं हें आकाश भरून गेलें नाहीं, मग त्या शौर्यराशि माझ्या पित्याच्या मरणाची गोष्ट कशाला बोलतोस ?" असें बोलतो आहे तों **द्रोणाचार्यां**चा सारथी **अश्वसेन** घायाळ झालेला

त्याजपाशीं आला आणि माझें रक्षण करा असें ह्मणूं लागला. त्याला पाहून **अश्वत्थामा** ह्मणाला, "अरे, त्रैलोक्याचें रक्षण करण्याविषयीं समर्थ अशा माझ्या ताताचा तू सारथी असतां मजपासून रक्षण इच्छितोस हें काय?" सारथी गहिंवरून ह्मणाला, आचार्यपुत्रा, "कोठला तुझा तात आणि कोठलें काय, तो आह्मा सर्वांस सोडून स्वर्गास गेला!" हे शब्द कानीं पडतांच **अश्वत्थामा** मूर्च्छित होऊन धाडकन् खालीं पडला. **अश्वसेनानें** त्याला सावध केलें. शुद्धीवर येतांच डोळ्यांस पाणी आणून तो ह्मणाला, "हे सुतवत्सल तात, हे धनुर्धरश्रेष्ठ, हे जामदग्न्यप्रियशिष्य, मला टाकून कोठें गेलास!" **अश्वसेन** त्याचें अनेक प्रकारें सांत्वन करून ह्मणाला, "कुमारा, असा शोक करूं नको. वीरपुरुषांना शोभणाऱ्या आपत्तीमध्येंच तुझ्या पित्याचा अंत झाला. तेव्हां तूही त्यासारखेंच शौर्य दाखवून शोकसागर त-

रून सुखी व्हावें हेंच या प्रसंगीं योग्य आहे." **अश्वत्थामा** डोळे पुसून ह्मणाला, "**अश्वसेना**, एवढा भुजवीर्यसागर जो माझा पिता तो एकाएकीं कसा बरें आटून गेला ? **भीमार्जुन** हे त्याचे प्रियशिष्य असें जाणून दयालुत्वानें युद्धांत त्यांची त्याणें उपेक्षा केली ह्मणून ही त्याला गुरुदक्षिणा मिळाली, अथवा स्वतः **श्रीकृष्णानें** आपल्या सुदर्शनानें त्याचें प्राणहरण केलें. झालें तरी काय ? या तिघांशिवाय चौथ्याच्या हातून माझ्या पित्याच्या केशासही ढका लागण्याची शंकाच नको." **अश्वसेन** ह्मणाला, "कुमारा, तूं ह्मणतोस तसा कांहींच प्रकार झाला नाहीं. कसें झालें तें सांगतों ऐक. तुझा तात क्रोधावेशानें अत्यंत घोर संग्राम करीत असतां **भीमार्जुनांस** आवरेनासा झाला. इतक्यांत **अश्वत्थामा** या नांवाचा एक हत्ती युद्धांत मरून पडला ही संधि पाहून **श्रीकृष्णाच्या** सूचनेव-

रून **अश्वत्थामा** गज मेला असें **युधिष्ठिरानें** तुझ्या पित्यास सांगितलें. त्या सांगण्यांत आपणाला असत्य भाषणाचा दोष न लागावा व आपलें कार्यही व्हावें, ह्मणून शेवटचा गज हा शब्द त्याणें इतका हळु उच्चारिला कीं, तो तुझ्या पित्यास ऐकूं गेला नाहीं, आणि तू मेलास असें समजून त्याला अतिशय दुःख झालें व त्या योगानें त्याच्या हातचें धनुष्य आणि डोळ्यांतून अश्रु हीं दोन्हीं एकदम भूतळावर गळून पडलीं व अशा वेळीं शत्रूंनीं सहज त्याचा वध केला." ही दुःखकारक वार्ता ऐकतांच, "हा तात, हा सुतवत्सल, हा शौर्यराशे, हा शिष्यप्रिय, हा युधिष्ठिरपक्षपातिन्, माझ्या प्रीत्यर्थ व्यर्थ तू प्राणास मुकलास! माझ्या मरणाची असत्य वार्ता ऐकून त्वां प्राणत्याग केला आणि तू मृत झालास तरी मी अद्यापि जीव धारण करीत आहें; तस्मात् माझ्यासारखा कृतघ्न कोणी

नाहीं. तुझ्या पुत्रवात्सल्यास मी अगदीं अपात्र आहें." असें ह्मणून तो ढळढळां रडूं लागला.

इकडे समरांगणांतून **कृपाचार्य** मामा **अश्वत्थाम्या**चा शोध करीत येत होते. वाटेनें चालतां चालतां ते आपणाशीं ह्मणतात, "पूर्वी एका प्रसंगीं **द्रौपदी**च्या केशांचें कर्षण आणि आजच्या प्रसंगीं **द्रोणाचार्यां**च्या केशांचें कर्षण हीं दोन्हीं कृत्यें निमूटपणें पाहाणाऱ्या **दुर्योधना**ला, त्याच्या सर्व भ्रात्यांना, त्या अजातशत्रु **युधिष्ठिरा**ला, त्या सकल राजमंडळाला, आणि हातीं निरर्थक शस्त्र धारण करणाऱ्या आह्मासारख्या शेंदाडशिपायांना सर्वांसच धिक्कार असो ! इतके सर्व जवळ असतां असल्या निंद्य कर्माचा प्रतिबंध एकाच्यानेंही करवला नाहीं, तस्मात् धिक्कार असो त्यांच्या शौर्याला ! आतां **अश्वत्थाम्या**ला मीं कोणत्या तोंडानें भेटावें आणि त्याचें सांत्वन तरी कसें करावें !

पण नाहीं, तो लोकस्थिति जाणतच आहे. हिमालयाप्रमाणें खंबीर त्याचें अंतःकरण कधीं डगमगावयाचें नाहीं. तेव्हां अशा अढल धैर्याचा वीर शोकाधीन होऊन रडत बसेल असें मनांतही आणावयास नको. आपल्या पित्याचा अशा निंद्य प्रकारानें अंत झाला हें ऐकून तो काय अनर्थ करील कोण जाणे. पहिल्या केशाकर्षणाचा कसा दारुण परिणाम झाला तो दिसतच आहे. आतां या दुसऱ्यामुळें सर्व प्रजेचा संहार होणार यांत संशय नाहीं." असें ह्मणत **अश्वत्थामा** शोक करीत बसला होता तेथें येऊन तो पोहोंचला. इकडे **अश्वत्थाम्याचा** विलाप चाललाच होता. तो वर आकाशाकडे पाहून ह्मणूं लागला, "हा तात, हा सकलभुवनैकगुरो! तुला मी आतां कोठें पाहूं! अरे **युधिष्ठिरा,** त्वां जन्मांत कधींही असत्य भाषण केलें नाहीं, कधीं कोणाचा द्वेष केला नाहीं; ह्मणून तुला अ-

जातशत्रु ह्मणतात; पण हे दोन्ही, तुझे गुण, माझा पिता, तुझा गुरु आणि त्यांतून श्रेष्ठ ब्राह्मण याच्या संबंधानें आज कसे लयास गेले? तस्मात् माझ्या दुर्दैवाचाच हा परिणाम असें ह्मटलें पाहिजे." इतक्यांत **अश्वसेनानें कृपाचार्य** आल्याची खबर त्यास कळविली. मामाकडे पाहातांच त्याचा गळा दाटून आला आणि ह्मणाला, "मामा, आज सेनेचें आधिपत्य स्वीकारून तुमच्या बरोबर जो रणभूमीवर गेला, शूरांचा युद्धविषयक भुजकंडू शमन करण्याविषयीं ज्याचा हातखंडा असे, ज्याच्याशीं तुह्मी विनोद करून नित्य आनंदानें काळ घालवीत असां, तो तुमच्या भगिनीचा श्लाघ्य भर्ता आज कोणीकडे गेला? त्याला सोडून तुह्मी एकटेच एथें कां आलां?" हें भाषण ऐकून **कृपाचार्य** ह्मणाले, "वत्सा, झालेली गोष्ट तुला कळलीच आहे; मग माझ्या तोंडून पुनः ती कशाला व-

दवतोस ? आतां हा आपला शोक आवर ह
णजे झालें." **अश्वत्थामा** ह्मणाला, "माम
मी आतां शोक कशाला करूं ? माझा तात जि
कडे गेला तिकडेसच मी जाणार; कारण माझ
वियोग न व्हावा ह्मणून त्याणें परलोकची वा
धरिली तेव्हां मी तरी त्यापासून आतां निरा
कसें राहावें." **कृपाचार्य** ह्मणाले, "बाबा, तुझ्या
सारख्याला असें बोलणें आणि करणें योग
नाहीं. जोंपर्यंत आपण संसारांत आहों तोंपर्यं
असे प्रसंग यावयाचेच. पित्याची इहलोकं
आणि परलोकीं सेवा करणें हा सत्पुत्राचा ध
होय. तू जिवंत राहिलास तर श्राद्धांजलिदानां
मृतपित्याची सेवा तुझ्या हातून घडेल, मग म
रण्यांत काय अर्थ आहे ?" हें भाषण ऐकू
**अश्वत्थामा** ह्मणाला, "मामा, तुह्मी ह्मणतां हे
सर्व खरें; परंतु हा तातवियोगजन्य दुःखभा
मला इतका दुःसह झाला आहे कीं, त्याच्य

खालीं हे माझे प्राण फार वेळ वांचणार नाहींत; यासाठीं जिकडे तो गेला तिकडे मीही जाईन आणि त्याला पाहून सुखी होईन. आतां हा शस्त्रग्रहण व्यापार पुरे झाला." असें ह्मणून अश्रुपूर्णनयनांनीं शस्त्राकडे पाहून हात जोडून ह्मणाला, "हे भगवंता शस्त्रा, तुझें धारण ब्राह्मणाला अयोग्य होय; तथापि आपणाला कोणी मारावयास आलें असतां त्यापासून आत्मसंरक्षण करण्याकरितां शस्त्र हातीं धरणें विहित आहे अशी शास्त्रानुज्ञा जाणून माझ्या पित्यानें तुला हातीं धरिलें, यामुळें तो त्रिभुवनाला अजिक्य होता; परंतु निरुपायास्तव त्याला जसें शस्त्र खालीं ठेवणें भाग पडलें तसाच मीही तुझा आतां त्याग करितों. ईश्वर तुझें कल्याण करो." असें ह्मणून हातांतील तरवार खालीं ठेवणार इतक्यांत कोणी एक पुरुष मोठ्यानें ओरडून असें ह्मणतांना त्यानें ऐकिलें कीं, "अहो राजांनो,

सकल क्षत्रियांचा गुरु जो **द्रोणाचार्य** त्याचा तुमच्या सर्वांच्या समक्ष त्या घातक्यानें अशी विटंबना करून घात केला हें पाहून तुमच्यानें स्वस्थ राहाववलें तरी कसें? पुत्रशोकानें व्याकुल होऊन त्या त्रिभुवनगुरूनें हातचें धनुष्य खालीं ठेविलें व ढळढळां रडण्यास आरंभ केला, अशा स्थितींत त्याचे पिकलेले केश हातांत धरून त्या दुष्ट **धृष्टद्युम्नानें** त्याचा शिरच्छेद केला आणि शिबिराकडे पलायन केलें हें तुमच्यानें कसें सहन करवलें? हे शब्द कानीं पडतांच **अश्वत्थाम्या**च्या अंगावर रोमांच उभे राहिले व त्याची शोकाकुल वृत्ति नाहींशी होऊन अंगांत वीरश्रीचा संचार झाला, आणि तरवार खालीं ठेवणार होता ती पुनः सांवरून धरून मोठ्या क्रोधावेशानें ह्मणाला, "मामा, ऐका हे शब्द! प्रसंगानुसार पुत्रशोकानें विव्हल होऊन माझ्या वृद्ध पित्यानें हातचें शस्त्र खालीं ठेविलें, अशा वेळेस

सर्व धनुर्धारी राजांच्या देखत त्या चांडाळानें त्याचा वध करावा हें योग्य ना? धिक्कार असो त्यांच्या त्या धनुर्धारीपणाला!" नंतर वर आकाशाकडे पाहून ह्मणाला, "हे पुत्रवत्सला, या हतभाग्य पुत्रासाठीं शस्त्रत्याग करणें भाग पडून अशा नीचाच्या हातून तुझी विटंबना व्हावी, केवढें हें दुर्भाग्य! अथवा यांत कशाची विटंबना आणि कशाचें दुर्भाग्य! सुतशोकाधीन होऊन बेशुद्ध झालेल्या वीराच्या शरीरास त्या दुष्टानें स्पर्श केला काय आणि कावळ्याकुत्र्यांनीं स्पर्श केला काय सारखाच! असो. शस्त्रास्त्रविद्यारूप धनाच्या गर्वानें उन्मत्त झालेल्या त्या दुष्टाच्या शिरावर आतां लात हाणून त्याला जमिनदोस्त करून टाकितों. अरे दुरात्म्या पांचालकुलाधमा! माझ्या तातानें शस्त्रत्याग केला असें पाहून निर्भयपणानें त्याच्या मस्तकास स्पर्श करतांना तुला लाज कशी वाटली नाहीं? आणि तें नी-

चकर्म करीत असतां, कापसाचा ढीग जसा वारा चोहोंकडे उडवून नेतो त्याप्रमाणें हा धनुर्धारी **अश्वत्थामा** पांडव पांचालादिकांच्या सैन्यांचा धुडगूस उडवून दिल्यावांचून कधीं राहावयाचा नाहीं हें तुझ्या मनांत कसें आलें नाहीं? अरे **युधिष्ठिरा,** तुला अजातशत्रु ह्मणतात, सत्यवादी ह्मणतात, धर्मशील ह्मणतात. तुझा त्या बिचाऱ्यानें कोणता बरें अपराध केला होता? अथवा सद्गुणांचें पांघरूण घेतलेल्या या ढोंग्याशीं काय बोलावयाचें आहे! अरे **अर्जुना,** हे **सात्यके,** हे महाबल **भीमा,** हे **माधवा,** त्रिभुवनामध्यें ज्याच्यासारखा धनुर्धर मिळावयाचा नाहीं, ह्मणून ज्याला सर्वांचा गुरु असें ह्मणत, जो जातीचा ब्राह्मण, तशांत ह्मातारा, आणि त्यांत विशेषेंकरून माझा बाप, अशा वीरपुरुषाच्या मस्तकास त्या द्रुपदकुलकलंक नरपशूनें स्पर्श केला असतां तुह्मीं कोणींही त्याचें निवारण केलें

नाहीं हें योग्य झालें काय ? पण हे तरी काय, सारेच पापशिरोमणि !" असें ह्मणून मोठ्या आवेशानें बोलूं लागला, " मामा, आतां मी काय करणार तें सांगतों, ऐका. **भीम** असो, **अर्जुन** असो, अथवा प्रत्यक्ष **कृष्ण** असो, ज्यांणीं ज्यांणीं ह्मणून धर्मयुद्धाच्या मर्यादेचें उल्लंघन करून हें ब्रह्महत्येचें पातक केलें आहे, अथवा तें करण्याविषयीं अनुमोदन दिलें आहे, किंवा तें डोळ्यांनीं पाहिलें आहे, त्या सर्व नरपशूंच्या रक्तमेदमांसांचा आज मी दिग्देवतांना बळी अर्पण करीन, आणि असें करीन तरच माझें नांव **अश्वत्थामा** ! अहो पांडवमत्स्यसोमक मागधेय आदिकरून, क्षत्रियकुलाधमहो, पूर्वी **सहस्रार्जुनानें** साधूंचा छळ मांडिला त्या वेळीं **श्रीपरशुरामानें** ज्वलदग्निप्रमाणें तेजस्वी परशु हातांत घेऊन जें कर्म केलें तें तुह्मीं ऐकिलें नाहीं काय ? तेंच कर्म हा **अश्वत्थामा** आज क्रोधव-

श होऊन या रणांगणांत करून दाखविणार; यासाठीं नीट संभाळून राहा." याप्रमाणें भाषण करून त्यानें सारथ्याला आपला युद्धाचा रथ सर्व आयुधांसह घेऊन येण्यास सांगितलें. **कृपाचार्य अश्वत्थाम्याचें** हें आवेशयुक्त भाषण ऐकून ह्मणाले, "वत्सा, बापासारखाच तू पराक्रमी आणि शस्त्रास्त्रविद्येंत निपुण आहेस, तेव्हां तूं मनावर घेतलें तर **काय न करशील?** तुझ्या ताताचा जो अत्यंत नीच प्रकारानें अंत झाला त्याचा सूड उगविण्याचें सामर्थ्य तुजवांचून दुसऱ्या कोणाच्याही अंगीं दिसत नाहीं; यासाठीं त्वां सेनेचें आधिपत्य स्वीकारून आज युद्धास उभें राहावें अशी माझी इच्छा आहे; कारण, तूं जर हें काम पतकरलें नाहीं तर **भीष्मद्रोणांच्या** पाठीमागें कौरवसैन्याचें संरक्षण करण्याविषयीं त्यांच्यासारखा पराक्रमी वीर कोणीही राहिला नाहीं. तू जर कमर बांधशी-

ल तर त्रैलोक्यालाही जिंकशील, मग पांडवसैन्याची कथा काय? आणि हाच विचार मनांत आणून तुला सेनापति करावें अशा हेतूनें सर्व तयारी करून **दुर्योधन** तुझी वाट पाहात बसला असेल असें मला वाटतें." हें भाषण ऐकून **अश्वत्थामा** ह्मणाला, "मामा, तुह्मी ह्मणतां तसें **दुर्योधनाच्या** मनांत असेल असें मला वाटत नाहीं; पण खरोखर त्याची जर तशी इच्छा असेल आणि तातवधामुळें जर त्याला कांहीं दुःख झालें असेल तर त्याचा परिहार करून शोकाग्नींत होरपळून गेलेलें माझें चित्त शत्रुनाशरूप जलाच्या सिंचनानें शांत करण्यास मी तयारच आहें." असें ह्मणून ते दोघेजण **दुर्योधनाकडे** जावयास निघाले.

तिकडे **दुर्योधन** आणि **कर्ण** हे उभयतां समरांगणाच्या एका बाजूस एका वडाच्या झाडाखालीं चिंताक्रांत होऊन बसले असतां **दुर्यो-**

**धन कर्णा**ला ह्मणाला, “ मित्रा **कर्णा**, शूरांची गोष्ट अशी आहे कीं, लढाईत कोणी आप्तही पडला असतां रडत न बसतां तज्जन्य शोकसागरांत आपल्या बाहुबळरूप नौकेच्या आश्रयानें तरून जावयाचें. असें असतां आचार्यांनीं पुत्रवधाची बातमी ऐकतांच ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं शस्त्रत्याग केला हा मोठा चमत्कार आहे! अथवा ह्मण आहे कीं, जातिस्वभाव सुटत नाहीं; त्याप्रमाणें त्यांणीं शोकांध होऊन क्षात्रधर्माचा कर्कशपणा टाकून ब्राह्मणधर्माला योग्य जें मृदुत्व तें स्वीकारिलें असावें.” हें ऐकून **कर्ण** ह्मणाला, “राजा, असें नव्हे. तूं त्या **द्रोणाचार्या**ला पुरा ओळखला नाहीं. त्याचा स्वभाव लहानपणापासूनच मोठा कपटी आणि मतलबी; ह्मणूनच **द्रुपद**राजानें त्याला आपल्या राज्यांतून हांकून लाविलें. मीच असें ह्मणतों असें नाहीं; पाहिजे त्याला ही गोष्ट विचार. त्याणें या वेळेस

शस्त्रत्याग कां केला याचें कारण तुझ्या ध्यानांत आलें नाहीं. या युद्धामध्यें सर्व क्षत्रियराजांनीं **कौरवपांडवां**चा पक्ष धरून लढावें आणि सर्वांचा नाश झाला ह्मणजे आयतेंच **अश्वत्थाम्याला** राज्यपदावर बसवावें असा त्याचा मतलब होता; पण तो जेव्हां फसला गेला तेव्हां आपणास आतां लढून काय कर्तव्य आहे असें ह्मणून निराशेनें त्याणें शस्त्र खालीं ठेविलें." हें ऐकून **दुर्योधन** ह्मणाला, "मित्रा **कर्णा**, तू ह्मणतोस तें खरें असें मलाही आतां वाटूं लागलें आहे; कारण, असें जर नसतें तर **जयद्रथाला** त्याणें अभय दिलें असून **अर्जुनानें** त्याचा वध केला तेव्हां त्याच्या निवारणाची त्याणें उपेक्षा केली नसती, व **पांडवांकडील** मुख्य मुख्य वीरांशीं लढतांना त्याणें कुचराई केली नसती; तस्मात् तू ह्मणतोस हें सर्व जुळतें खरें." याप्रमाणें त्या उभयतांचीं भाषणें चाललीं असतां **कृपा-**

चार्य व **अश्वत्थामा** हे दोघे तेथें येऊन पोंचले. त्यांना पाहतांच **दुर्योधनानें** उठून **कृपाचार्यास** नमस्कार केला आणि **अश्वत्थाम्या**चा हात धरून ह्मणाला, " मित्रा, मला एकवार गाढालिंगन दे. या तुझ्या सुंदर शरीराचा आणि आचार्यांच्या बाहूंप्रमाणेंच पराक्रमी या तुझ्या बाहूंचा स्पर्श शोकावस्थेंतही मला अत्यंत सुखावह होत आहे. या समयीं तू दुःखी तर खराच; पण माझ्याही दुःखाला कांहीं पारावार नाहीं; कारण, तो तुझा पिता होता आणि माझ्या पित्याचा परम मित्र होता; तसाच आपला उभयतांचा तो विद्यागुरु होता; तेव्हां त्याच्या मरणानें मला किती दुःख होत आहे तें म्यां सांगावें असें नाहीं. तुझ्या अनुभवावरून तें तू जाणतच आहेस. " हें भाषण ऐकून **अश्वत्थामा** डोळ्यांस पाणी आणून ह्मणाला, " राजा, तू माझा पक्षपाती आहेस येणेंकरून माझा शो-

कभार हलका झाला खरा; तथापि मी जिवंत असतां माझ्या ताताच्या केशांस शत्रूनें स्पर्श केला आणि तुह्मीं सर्वांनीं तो निमुटपणें पाहिला ह्मणून मला अतिशय दुःख होतें, आणि मी त्याच्या पोटीं जन्मून व्यर्थ झालों असें वाटतें."

**कर्ण** हें भाषण ऐकत होताच. तो ह्मणाला, "द्रोणपुत्रा, आतां शोकानलांत व्यर्थ आत्मा जाळून काय उपयोग होणार? शत्रूपासून संरक्षण होण्यासाठीं सर्वांची ज्याच्यावर भिस्त त्याणेंच हातपाय गाळून आपली अशी दुर्दशा करून घेतली, तेव्हां आह्मीं तरी काय करावें?"

**अश्वत्थामा** ह्मणाला, "**अंगराजा**, काय करावें ह्मणतोस? मी तर असें केलें असतें कीं, **पांडवांच्या** सैन्यामध्यें जो जो ह्मणून भुजबळाच्या गर्वानें शस्त्रधारण करणारा असेल त्याचा किंवा **पांचाल**कुलांतील प्रत्येकजणाचा—मग तो वृद्ध असो, तरुण असो, बाळ असो, अथवा

गर्भस्थ असो—त्या प्रसंगीं क्रोधावेशानें फडशा पाडिला असता; इतकेंच नव्हे तर प्रत्यक्ष काळ जरी आडवा आला असता तरी त्यालाही ठार करून टाकिलें असतें. हे जामदग्न्य शिष्य **कर्णा**, आणखी काय केलें असतें तें सांगतों ऐक. पूर्वी याच समरभूमीवर **परशुरामानें** आपल्या बापाचा वध करणाऱ्या क्षत्रियांचा संहार करून जसे रक्ताचे पूर वाहविले तशीच दुर्दशा माझ्या ताताचे केश धरून ओढणाऱ्या दुष्ट चांडाळाची मीं करून टाकिली असती." इतक्यांत **कृपाचार्य** ह्मणाले, "राजा, खरोखरच **द्रोणाचार्यां**च्या मागें या संग्रामाचें धुरीणत्व घेण्यास हाच योग्य आहे. यासाठीं मला वाटतें कीं, जर तूं याचा आश्रय करून याला सेनाधिपति करशील तर हा त्रैलोक्याचाही उच्छेद करील, मग पांडवसेनेची कथा काय! तुझ्या मनांत **अंगराजाला** सेनापति करावें असें कदा-

चित् असेल; पण तुला सांगतों, हा द्रोणपुत्र अगोदरच पितृवियोगानें अत्यंत दुःखी झाला आहे, अशा वेळीं **अंगराजा**च्या भिडेखातर याचा अपमान करणें युक्त नाहीं. तो काय आणि हा काय, कोणीही सेनापति झाला तरी शत्रूचा नाश करावयाचा हाच हेतु आहे. मग याचें तरी मन कशाकरितां दुखवावें ?" इतक्यांत **अश्वत्थामा** ह्मणाला, "राजा कौरवेश्वरा, तू काय अशा मोठ्या विचारांत पडला आहेस ? माझ्यावर सारा भार टाकून स्वस्थ राहा. आजच्या आजच मी आपल्या शस्त्रकुठारानें शत्रुकाननाचा फडशा पाडून **कृष्ण, पांडव, सोमक पांचाल** इत्यादिकांचें नाम मात्र शेष राहील असा पराक्रम गाजवून या रणकथेची समाप्ति करितों." ही गर्वोक्ति **कर्णा**स न रुचून तो ह्मणाला, "द्रोणपुत्रा, बोलणें सोपें आहे; पण करणें फार कठिण आहे. असा पराक्रम करणारे वीर या कौरवसैन्यांत

दुसरे कोणी नसतील असें समजूं नको. " **अश्वत्थामा** ह्मणाला, " **अंगराजा**, दुसरे पुष्कळ आहेत हें मी जाणून आहें; परंतु मी जें बोललों तें केवळ दुःखातिशयानें बोललों. वीरपुरुषांची, अवहेलना करावी या बुद्धीनें बोललों नाहीं. " **कर्ण** ह्मणाला, मूढा, अशा गोष्टीपासून ज्याला दुःख होतें त्याणें रडत बसावें आणि ज्या शस्त्रधारी शूराला क्रोध येतो त्याणें संग्रामांत जाऊन पराक्रम दाखवावा हेंच योग्य. उगीच रिकामी बडबड करीत बसूं नये. " हें निंदायुक्त भाषण ऐकतांच **अश्वत्थाम्यास** अतिशय संताप आला आणि मोठ्या आवेशानें तो **कर्णा**स ह्मणाला, " अरे, राधागर्भभारभूता, तू माझी निंदा करून मला दुःखाची शांति रडून करावयास सांगतोस काय? माझ्यामध्यें कांहीं पराक्रमच नाहीं असें तुला वाटतें? नीचा सारथिपुत्रा, सांगतों ऐकून घे. माझीं शस्त्रास्त्रें तुझ्यासारखीं गुरूच्या

शापानें निर्जीव झालीं नाहींत, किंवा तुझ्यासारखा मी समरांगणांतून भयानें पळून गेलों नाहीं, अथवा तुझ्यासारखा मी नीच कुळांत जन्मलोंही नाहीं; तेव्हां शत्रूनें केलेल्या अपराधाचा प्रतिकार मी डोळ्यांतून पाणी काढून करणारा नव्हें, शस्त्रानेंच करणारा आहें हें खूप समजून रहा." हें ऐकतांच **कर्ण** रागानें लाल झाला आणि ह्मणाला, " अरे वाचाळा, शस्त्रविद्येची वृथा बढाई मिरवून तू मला लावून बोलतोस काय? मी सारथी असेन किंवा सारथ्याचा पुत्र असेन, कोणीही असलों तरी काय चिंता आहे? उत्तम कुलांत जन्म होणें हें दैवाधीन आहे पण पराक्रम तर माझ्या स्वाधीन आहे. माझीं शस्त्रास्त्रें निर्जीव असोत वा सजीव असोत, पण शूरत्वाची घमेंडी बाळगणाऱ्या तुझ्या बापानें त्या **धृष्टद्युम्नाला** भिऊन जसें शस्त्र खालीं ठेविलें तसें मीं तर केलें नाहींना? बापाची निंदा ऐकून

अश्वत्थाम्याच्या अंगाची लाही झाली आणि तो ह्मणाला, " अरे रथकारकुलकलंका, विद्येचा व्यर्थ भार वाहणाऱ्या राधेच्या पोरा, तू माझ्या ताताची देखील निंदा करतोस काय? तो भित्रा असो, किंवा शूर असो. त्याचा पराक्रम त्रिभुवनाला विदितच आहे. त्याणें प्रतिदिनीं आपलें शौर्य गाजवून काय केलें तें त्या समरांगणांतील वीरांनाच ठाऊक, किंवा प्रसंगीं त्याणें शस्त्राचा त्याग कां केला हें सत्यव्रताचें ढोंग करणाऱ्या त्या युधिष्ठिराला माहीत. तुला पळपुट्या भेकडाला त्याचें कारण कसें समजणार? " हें भाषण ऐकून कर्ण किंचित् हंसून ह्मणाला, " होहो! मी भेकड आणि तू मात्र मोठा रणशूर खराच! पण मूर्खा, मी तुला असें विचारितों कीं, शस्त्रधरानें हातचें शस्त्र खालीं जरी ठेविलें तरी त्यावर जर कोणीं शस्त्र उगारिलें तर त्याणें त्याचें निवारण करूं नये काय? तुझ्या बापाच्या आं-

गांत जर सामर्थ्य होतें तर त्याचें शिर शत्रूनें हातीं धरल्याबरोबर सर्व राजमंडळाच्या समक्ष भित्र्यासारखा तो निमूटपणें कां बरें बसला?" हें भाषण ऐकतांच **अश्वत्थाम्यास** फारच त्वेष आला, आणि तो ह्मणाला, "दुष्टा सूताधमा, काय ही बडबड चालविली आहेस. मूर्खा, माझ्या बापानें त्या दुष्ट **धृष्टद्युम्ना**चा हात दुःखानें धरला नाहीं किंवा भीतीनें धरला नाहीं, कसेंही असो; पण तू जो आपल्या भुजबळाची एवढी शेखी मिरवीत आहेस त्या तुझ्या बोडक्यावर ही पाहा मी आपल्या डाव्या पायानें लात मारून तुला जमीनदोस्त करून टाकितों. जर तुझ्यांत कांहीं धमक असेल तर याचें निवारण कसें करतोस तें पाहातों." असें ह्मणून त्याला लात मारावयास जातो तों **कृपाचार्य** आणि **दुर्योधन** मध्यें पडून त्याचें निवारण करूं लागले. इकडे **कर्ण**ही अतिशय क्रोधाविष्ट होऊन

ह्मणाला, "अरे दुरात्म्या ब्राह्मणाच्या पोरा, उगीच फुशारकी कशाला मारतोस? जातीचा ब्राह्मण पडलास नाहीं तर आतांच तुझे तुकडे तुकडे करून टाकिले असते; तथापि हा जो तूं आपला पाय वर उचलला आहेस तो छाटून टाकितों पाहा." असें ह्मणून तरवार उपसून त्याच्या आंगावर धांवला; तेव्हां **अश्वत्थामा** ओरडून ह्मणाला, "मूर्खा, ये ये, काय करतोस तें पाहातों. तुझा प्राण मीच घेऊन **अर्जुनाला** आज मिथ्याप्रतिज्ञ करितों. हिंमत असेल तर हातांत शस्त्र घेऊन उभा राहा; नाहीं तर शरण येऊन पायां पड, तरच वांचशील. मी ब्राह्मण ह्मणून तुला अवध्य वाटत असेल तर ही पाहा मी आपली जातीही टाकून देतों." असें ह्मणून रागानें आपलें यज्ञोपवीत तोडून टाकणार, इतक्यांत **कृपाचार्यांनें अश्वत्थाम्यास** आणि **दुर्योधनानें कर्णास** हातांनीं धरून दोहोंकडे

केलें. तेव्हां **अश्वत्थामा** ह्मणाला, "मामा, हा सारथ्याचा पोर ताताची निंदा करीत आहे यावरून हा त्या दुष्ट **धृष्टद्युम्नाचा** साथी आहे असें उघड दिसतें; ह्मणून या वेळेस तुह्मी माझें निवारण करूं नका. राजा **दुर्योधना**, तूंही यावेळेस या कामांत मला भीड घालूं नको. हं हं ह्मणतां या दुरात्म्याचा मी आपल्या बाहुबलानें चुराडा करून टाकितों. स्नेहाखातर किंवा याच्यापासून कांहीं उपयोग होईल ह्मणून जर तू या उन्मत्त निंदकाचें संरक्षण करूं इच्छीत असशील तर तें अगदीं व्यर्थ आहे. चंद्रवंशोद्भव तुझ्यासारखा गुणवान् राजा कोणीकडे आणि हा हीनकुलोत्पन्न सारथ्याचा पोर कोणीकडे! याच्यापासून तुला काय साह्य व्हावयाचें आहे? तुला पाहिजे असल्यास आजचे आजच ही पृथ्वी **कर्णार्जुन**विरहित करून टाकीन असें माझ्यामध्यें सामर्थ्य आहे." इकडे **कर्ण**ही **दुर्योधनास**

ह्मणूं लागला, "राजा, वृथाभिमान बाळगणाऱ्या नीच पुरुषाची शूरांनीं उपेक्षा केली तर ते फार चढून जाऊन नाहीं नाहीं तें बडबडतात; यासाठीं मला या वाचाळ भटुरग्याची खोडच मोडली पाहिजे." असें ह्मणून तरवार उगारून **अश्वत्थाम्यावर** धांवून गेला. पुनः **कृपाचार्य** व **दुर्योधन** मध्यें पडून ह्मणाले, "अरे तुह्मी हें आज काय मांडिलें आहे? प्रसंग कोणता आहे, आणि आपापसांतच असें भांडत सुटलां तर निभाव कसा लागेल?" नंतर **कृपाचार्यानें अश्वत्थाम्यास** एकीकडे करून असें सांगितलें कीं, "वत्सा, आपल्याच पक्षांतील मुख्य मुख्य वीरांशीं विरोध करण्याचा हा समय नव्हे हें मनांत आणून तू तरी उगाच राहा." **अश्वत्थामा** ह्मणाला, "मामा, तुह्मी सांगतां तर माझा कांहीं आग्रह नाहीं. हें पाहा मी आपलें शस्त्र खालीं ठेवितों, आणि हा पापात्मा शत्रूंच्या शरांनीं

गतप्राण होई तोंपर्यंत मी तें कधीं हातीं धरणार नाहीं अशी शपथही वाहतों. हा खुशाल सेनापति होवो; पण, तुह्माला खचित सांगतों, हा जेव्हां त्या **भीमार्जुनां**च्या तडाख्यांत सांपडेल तेव्हां राजाला पश्चात्ताप झाल्यावांचून राहणार नाहीं," असें ह्मणून त्याणें हातांतील तरवार खालीं ठेविली, तें पाहून **कर्ण** हंसून ह्मणाला, "याच्या सारख्या शेंदाड शिपायानें शस्त्र हातांत धरून तरी काय व्हावयाचें आहे ? माझ्या हातांत जोंपर्यंत शस्त्र आहे तोंपर्यंत कोणाच्याही शस्त्राचा प्रभाव चालावयाचा नाहीं, आणि जें कार्य माझ्याच्यानें होणार नाहीं तें करण्याविषयीं दुसऱ्या कोणाचीच छाती व्हावयाची नाहीं."

वरील भाषणें चाललीं असतां तिकडे समरांगणांत **दुःशासनास** जर्जर करून **भीमसेन** आपली प्रतिज्ञा सिद्धीस नेत असतां मोठ्यानें ग-

र्जना करून ह्मणाला, "दुष्टा, धार्तराष्ट्राधमा, **द्रौपदी**चे केश आणि वस्त्र ओढून त्वां जें महापातक केलें त्याचें प्रायश्चित्त घेण्यासाठीं बरा माझ्या तावडींत सांपडला आहेस, आतां कोठें जातोस तें पाहातों. अहो **राधेय, दुर्योधन, शकुनि** आदिकरून पांडवद्वेष्टयांनो ! मी काय ह्मणतों तें नीट कान देऊन ऐका, आणि तुमचें धनुर्धारित्व आतां कसें काय आहे तें दाखवा. ज्या नरपशूनें **पांचालराजतनयेच्या** केशांस आपल्या अपवित्र हातांनीं स्पर्श केला, ज्यानें सर्व राजमंडळांदेखत तिचें वस्त्र अंगावरून ओढिलें, ज्याचें उरस्थळ फोडून त्यांतील रक्तासव प्राशन करण्याची म्यां प्रतिज्ञा केली तो हा चांडाळ माझ्या भुजपंजरांत सांपडला आहे. याची सुटका करण्याची तुमची छाती होत असेल तर पुढें या." ही बातमी समजतांच **अश्वत्थामा कर्णा**स लावून ह्मणाला, "अहो **अंगराज** से-

नापते, अहो **जामदग्यशिष्य,** अहो **द्रोणाचार्यांची** निंदा करणारे, आणि आपल्या मणगटाच्या जोरानें त्रिभुवनाचें रक्षण करणारे, 'माझ्या शस्त्रापुढें कोणाचाही प्रभाव चालावयाचा नाहीं,' असें आतांच ना तुह्मी ह्मणत होतां ? तुमची परीक्षा करण्याची हीच वेळ आहे. आतां पुढें व्हा आणि त्या **भीमसेनाच्या** हातांतून **दुःशासनाला** कसें सोडवतां तें दाखवा." नंतर **दुर्योधनाकडे** पाहून त्याला ह्मणाला, "राजा कौरवेश्वरा, **भीष्मद्रोणांच्या** पाठीमागें **भीमार्जुनांनीं** तुझ्या सैन्यामध्यें मोठा अनर्थ मांडिला आहे, त्याचें निवारण या **राधेयाच्यानें** किंवा त्याच्यासारखी नुसती तोंडाची बडबड करणाऱ्या दुसऱ्या कोणत्याही वीराच्यानें व्हावयाचें नाहीं; यासाठीं भ्रात्याचें संरक्षण करण्याकरितां तूच स्वतः कंबर बांधशील तरच त्याच्या जीवाची आशा आहे." या भाषणाचा धिक्कार करून दु-

**र्योधन** आणि **कर्ण** दोघेही ह्मणाले, "द्रोणपुत्रा, तू काय एवढें मोठें भय घालीत आहेस! आह्मी एवढे धनुर्धर जीवंत असतां **दुःशासना**च्या छायेलाही ढका लावण्याची कोणाची पुण्याई नाहीं," असें ह्मणून त्याला सोडविण्याकरितां ते दोघे समरांगणांत निघून गेले. तिकडे गेल्यावर **भीमसेना**ची प्रतिज्ञा शेवटास जाण्यास कांहीं विघ्न होऊं नये ह्मणून त्या दोघांस अडवून त्यांच्यावर **अर्जुनानें** अति तीक्ष्ण बाणांचा एकसारखा वर्षाव चालविला. **अश्वत्थाम्या**ला हें वर्तमान कळतांच तो फार घाबरून गेला, आणि आतां **दुःशासना**स ठार मारून **भीमसेन** त्याचें रक्त खचित प्राशन करणार असें त्यास वाटलें. आणि मनांत ह्मणतो, "**दुःशासना**ची अशी दुर्दशा होऊं देण्यापेक्षां असत्यवचनाचा दोष लागून मी नरकास गेलों तरी बेहेत्तर; पण यासमयीं त्याचें संरक्षण केलेंच पाहिजे" असें

मनांत आणून खालीं ठेविलेलें शस्त्र उचलावयास लागला, इतक्यांत, " अरे महात्म्या द्रोणपुत्रा, आजपर्यंत तूं कधींच असत्य भाषण केलें नाहीं, यासाठीं आज तसें करणें अगदीं अयोग्य आहे, " अशी आकाशवाणी झाली. ती ऐकतांच, " देव-ही **पांडवांचे** पक्षपाती होऊन मला संग्रामास जाण्याविषयीं अनुमोदन देत नाहींत, आतां का-य करावें ! **दुःशासनाचें** रक्त शत्रु प्राशन करीत असतां मी जर उदासीन राहिलों तर **दुर्योध-नाचें** हित माझ्या हातून काय होणार ? असें ह्मणून तो फार खिन्न झाला, आणि **कृपाचार्यास** ह्मणाला, " मामा, माझा तर निरुपाय झाला. त्या **राधेयावर** रागावून भलतीच शपथ वाहि-ली, आणि फशीं पडलों आतां तुह्मी तरी **दुर्यो-धनाला** साह्य करावयास जा. " असें सांगून आपण शिबिराकडे चालता झाला.

**कर्ण** आणि **दुर्योधन** हे **दुःशासनास** सो-

डविण्याकरितां समरांगणांत निघून गेले असें वर सांगितलेंच आहे. ते तिकडे जाऊन पोंचण्याच्या पूर्वींच उभय सैन्यांत मोठें घनघोर युद्ध होऊन त्यांत **भीमसेनानें दुःशासनास** मारून प्रतिज्ञा केल्याप्रमाणें त्याच्या उरस्थळांतील रक्त प्राशन केलें. त्यावेळेस त्याचें सर्वांग रक्तानें माखून गेल्यामुळें तो इतका भयंकर दिसूं लागला कीं, त्याला पाहातांच बाहुबळाच्या गर्वानें युद्धास प्रवृत्त झालेल्या व **कौरवां**करितां आपलें प्राणधन खर्च करण्यास सिद्ध झालेल्या शतशः राजांच्या हातचीं शस्त्रें पटापट खालीं गळून पडलीं, व सैन्यासहवर्तमान ते सैरावैरा पळूं लागले. **दुर्योधनालाही पांडवांनीं** शस्त्रास्त्रप्रहारांनीं घायाळ केलें त्या योगानें तो बेशुद्ध होऊन रथांत पडला. अशा धांदलींत, ज्याला सुवर्णाचे कळस आणि शुभ्र चामरें लाविलीं आहेत, व ज्याच्या ध्वजस्तंभावर उंच पताका फडकत आहे, आणि

जो सहस्त्रशः हत्ती, घोडे व पायदळ यांच्या कलेवरांनीं भरून गेलेल्या रणभूमीवरून धांवत चालला असतां धक्क्यांमुळें ज्यांतील घंटांचा घणघणाट चालला आहे, अशा रथांत बसून **कृपाचार्य** बाणवृष्टीनें शत्रुसैन्याचें बळ कुंठित करीत व **कौरव**सैन्यास आश्वासन देत त्या ठिकाणीं आले. इकडे **भीमसेन** मोठ्यानें गर्जना करून ह्मणाला, " अहो **कौरव**सैन्यांतील वीरहो, मला पाहून तुमच्या हातांतील धनुष्यबाण व शस्त्रास्त्रें गळून पडतात हें काय? मला पाहून असे घाबरूं नका. मी कोण आहें तें सांगतों ऐका. आपणास धनुर्धारी ह्मणविणारा असा जो **दुर्योधन** त्याच्या देखत, त्याचे सकल भ्राते, **कर्णशल्यादि** महावीर व **शकुनि** आदिकरून वडील माणसें जवळ असतां ज्यानें पांडववधूचे केश आणि वस्त्र धरून ओढिलें त्या दुष्ट **दुःशासनाचें** पुष्ट वक्षस्थळ आपल्या ती-

क्षण नखांनीं विदारून त्यांतील रक्त प्राशन करणारा, ज्यानें आपली प्रतिज्ञा शेवटास नेली आहे, व जो **कौरवांचा** द्यूतांत जिंकलेला दास तो हा मध्यम पांडव **भीमसेन** होय, समजलां ?

कौरववंशरूप महावनाचा उच्छेद करणारा महावात असा तो वायुपुत्र **भीमसेन** दृष्टीस पडतांच सर्व कौरवसैन्य घाबरून गेलें. **दुर्योधन** तर मूर्च्छित होऊन पडलेला होताच त्याच्यावरही कदाचित् **दुःशासना**प्रमाणें घोरप्रसंग येईल, ह्मणून त्याच्या सारथ्यानें जवळच एक वडाचें झाड होतें तिकडे त्याचा रथ पिटाळून नेला. तें झाड नुकतेंच पालवलें असल्यामुळें त्याची छाया दाट पडली होती, व जवळच्या सरोवरांतील सुगंधि कमलांवरून गार वारा वहात होता. असें तें युद्धांत श्रांत झालेल्या वीरांस विश्रांति घेण्यास योग्य स्थळ पाहून सारथ्यानें **दुर्योधना**चा रथ तेथें नेऊन उभा केला, आणि त्याला

वारा घालून सावध करूं लागला. त्या एकांतस्थळीं कोणी सेवकजनांविरहित **दुर्योधनाला** एकटाच पाहून सारथ्यास फार वाईट वाटलें, आणि तो ह्मणाला, “अरेरे, काय हा दुर्दैवाचा सपाटा! तो **जयद्रथ पार्था**च्या तडाख्यांत सांपडला असतां त्याचें संरक्षण **द्रोणाचार्यां**च्यानेंही न व्हावें, किंवा सिंह जसें हरणाचें नरडें फोडितो त्याप्रमाणें आज **भीमसेनानें दुःशासनाचें** ऊर फोडिलें तेव्हां त्याचें निवारण करण्याचें सामर्थ्य कोणामध्यें नसावें, केवढें हें दुर्भाग्य! **पांडवांनीं** केलेल्या प्रतिज्ञा दुःसाध्य जरी होत्या तरी दैव अनुकूल असल्यामुळें त्यांनीं त्या शेवटास नेल्या. एकाद्या मदोन्मत्त हत्तीनें अरण्यांतील सर्व झाडांमाडांचा चुराडा केल्यावर जसें एकादें झाड चुकून अवशिष्ट राहावें त्याप्रमाणें सर्व बांधवांचा नाश होऊन आमचे महाराज आज एकटे जरी उरले आहेत तरी दुर्दैव यांचा पि-

च्छा सोडित नाहीं! भरतकुलविमुखा दुष्टा प्रारब्धा! अरे शरीरावर एकही घाय न पडतां किंवा मरणाविषयीं ज्याचे बांधव कधीं संशयांत न पडतां त्या गदाधर **भीमा**ची प्रतिज्ञा त्वां शेवटास नेली हा केवढा तुझा पक्षपात!" याप्रमाणें विलाप करीत तो **दुर्योधनास** वारा घालून सावध करूं लागला. थोड्या वेळानें तो देहभानावर येतांच "अरे मी जिवंत असतां त्या वायुपुत्र **वृकोदरा**ची प्रतिज्ञा कधींही पूर्ण होऊं देणार नाहीं." असें ह्मणून त्याणें, "**दुःशासना**, भिऊं नको, भिऊं नको, हा मी आलों," असें ह्मणत **दुःशासन** लढत होता त्या ठिकाणीं रथ नेण्याविषयीं सारथ्याला सांगितलें; परंतु घोडे फार थकले आहेत, त्यांच्यानें रथ ओढवत नाहीं; ह्मणून आपण तिकडे जाऊं नये हें बरें असें जेव्हां सारथ्यानें सांगितलें तेव्हां **दुर्योधन** रागावून ह्मणाला, "अरे, मला रथाची गर-

ज नाहीं. एक गदा हातांत असली ह्मणजे कशाही युद्धाच्या गर्दीत एकटा पादचारी शिरण्यास हा **दुर्योधन** काळालाही भ्यावयाचा नाहीं. त्या माझ्या बाळकावर तो दुष्ट गदाप्रहार करीत आहे अशा वेळीं सोडविण्यासाठीं मी जात असतां तू मला जाऊं नका ह्मणतोस तेव्हां अशा प्रसंगीं तुला क्रोध येत नाहीं किंवा दया येत नाहीं अथवा लाजही वाटत नाहीं असें ह्मटलें पाहिजे." हें भाषण ऐकून सारथि ह्मणाला, "महाराज, क्षमा करा. मी तिकडे जाऊं नका असें ह्मणतों याचें कारण हेंच कीं, त्या दुष्ट **वृकोदरानें** कुमार **दुःशासनाचा** वध करून आपली प्रतिज्ञा शेवटास नेली! आतां आपल्या जाण्यापासून कांहीं उपयोग नाहीं." **दुःशासनाच्या** वधाची गोष्ट समजतांच **दुर्योधन** धाडकन् खालीं पडला आणि अत्यंत शोकाकुल होऊन ह्मणाला, "हा वत्सा युवराजा **दुःशासना**! हा

पराक्रमशालिन् ! शत्रुसैन्यरूप गजसमुदायास केवळ सिंहाप्रमाणें भासणारा असा तू असून तुझा असा परिणाम व्हावा ना ! बाळा, मला टाकून कोठें गेलास ! एक वेळ तरी मजशीं भाषण कर." याप्रमाणें विलाप करीत असतां त्याला मूर्च्छा आली. थोड्या वेळानें सावध होऊन पुनः मोठ्यानें दुःखोच्छ्वास टाकून ह्मणाला, "बाळा, मजपाशीं राहून तुला यथेच्छ सुखोपभोग घ्यावयास सांपडला नाहीं, किंवा मी तुझा वडील भाऊ असून तुझें कोड कौतुक पुरविलें नाहीं, अथवा तुझ्या या दुर्दशेला मीच कारण झालों ह्मणून मजवर रुसून मला सोडून गेलास काय? हाय हाय, आतां मी तुला कोठें पाहूं !" नंतर सारथ्याला ह्मणाला, मूर्खा, प्राणापेक्षांही मला अधिक प्रिय अशा त्या आज्ञाधारक बाळाची या रणमखांत आहुति पडत असतां माझा रथ तूं तेथून पळविलास हें फार वाईट केलें." सारथी

ह्मणाला, " महाराज, म्यां काय करावें ? शत्रु-सैन्यांतील वीरांनीं अनेकशः मर्मभेदक शस्त्रास्त्रांचा जेव्हां एकसारखा वर्षाव चालू केला, तेव्हां आपण बेशुद्ध होऊन पडलां हें पाहून मला रथ पळविणें भाग पडलें. " **दुर्योधन** ह्मणाला, अरेरे ! हें फार वाईट झालें. अरे, त्या बाळाचा निर्दयपणें वध करणाऱ्या त्या पांडवपशूच्या गदाप्रहारांनीं मी जर सावध झालों असतों तर आज रक्तशय्येवर त्याला निजविलें असतें किंवा मी तरी निजलों असतों. " पुनः उसासा टाकून वर पाहून ह्मणाला, " हारे दुर्दैवा ! या कुरुकुलावरच तुझी एवढी वांकडी नजर कशाकरितां ? माझे शंभर भ्राते मरण पावले. आतां मला एकट्याला जगून तरी काय करावयाचें आहे ? नको तें राज्य आणि नको तो जय. " याप्रमाणें निराश होऊन तो शोक करीत बसला.

तिकडे समरांगणांत उभयपक्षांचें तुमुल युद्ध

चाललेंच होतें. त्यांत **कर्णा**चा पुत्र **वृषसेन** याचा **अर्जुना**नें वध केल्यामुळें **कर्णा**ला अत्यंत वैताग येऊन तो प्राणत्याग करण्यास तयार झाला व तशा स्थितींत त्याणें **दुर्योधना**ला एक पत्र लिहून आपल्या **सुंदरक** नांवाच्या सारथ्या-बरोबर पाठविलें. **सुंदरक** तें पत्र घेऊन **दुर्यो-धना**चा शोध करीत करीत समरभूमीवरून येत असतां वाटेंत जो जो भेटला त्याला **दुर्योधन**म-हाराज तुह्मीं कोठें पाहिलेत काय असें विचारूं लागला; पण कोणी कांहींच सांगेना. नंतर त-साच पुढें चालला तों कित्येक वीरपुरुष शस्त्रा-स्त्रांनीं घायाळ होऊन पडले आहेत व त्यांचे से-वक त्यांच्या अंगांत शिरलेले बाण चिमट्यांनीं उपटून काढीत आहेत असें त्याणें पाहिलें. कांहीं पावलें पुढें जातो तों त्यास शोकग्रस्त झालेला असा एक वीरपुरुषांचा समुदाय आढळला. त्यांस **दुर्योधना**ची खबर विचारितां ते याला पाहून

अधिकच रडूं लागले. पुढें पाहातो तों एक हृदयद्रावक देखावा त्याच्या दृष्टीस पडला. तो असा कीं, कोणी एक वीरमाता आपला पुत्र रणांगणीं पडला हें ऐकून त्याच्या स्त्रीस तांबडें वस्त्र नेसवून व तिच्या अंगावर अलंकारभूषणें घालून तिजसहवर्तमान प्राणत्याग करावयास सिद्ध झाली आहे ! तिला पाहून सुंदरक ह्मणाला, "शाबास ! वीरमाते शाबास ! अशा कर्मानें पुढल्या जन्मीं तुझा पुत्र दीर्घायु होईल." नंतर कांहींसा पुढें जाऊन पाहातो तों कित्येक घायाळ झालेले लोक एका रिकाम्या घोड्याकडे पाहून रडत होते असें त्याच्या दृष्टीस पडलें, त्यावरून त्याच्यावर बसणारा कोणी पराक्रमी वीर रणांगणांत पडला असावा असें स्पष्ट दिसत होतें. सारांश, जिकडे जाई तिकडे सर्व लोक शोकाकुल होऊन संकटांत पडले आहेत असें त्याच्या पाहाण्यांत आलें. दुर्योधनाचा पत्ता कोणीच

सांगेना. शेवटीं कपाळास हात लावून तो ह्मणाला, "हारे दुर्दैवा! तुझा प्रभाव किती दुर्निवार आहे! अरे, जो अकरा अक्षौहिणी सैन्याचा स्वामी; एकाहून एक अधिक पराक्रमी असे ज्याला शंभर भ्राते; **भीष्म, द्रोण, जयद्रथ, शल्य, कृपाचार्य, कृतवर्मा, अश्वत्थामा,** इत्यादि महापराक्रमी वीर ज्याचे साह्यकर्ते; अशा या सार्वभौमराजाला तो कोठें आहे ह्मणून शोधीत हिंडण्याचा प्रसंग यावा हें केवढें दुर्भाग्य! अथवा दैवाला तरी काय ह्मणून बोल लावावा? या राजानें आपल्याच हातानें जो विषवृक्ष लाविला त्याचेंच फळ तो भोगीत आहे! **पांडवांच्या** संबंधानें **विदुराच्या** भाषणाची निर्भर्त्सना हें त्या वृक्षाचें बीज होय. **भीष्माचार्यांच्या** उपदेशाचा तिरस्कार हा त्याचा अंकुर. त्या दुष्ट **शकुनीच्या** चिथावणीचा आदर हें त्याचें खोड. लाक्षागृह, कपट-

द्यूत, विषभोजन, इत्यादि प्रयत्न या त्याच्या शाखा. दिवसानुदिवस वाढत चाललेलें वैर हें त्याचें आळें, आणि त्या **पांचालतनये**च्या केशांचें आकर्षण हें त्याचें जलसिंचन. मग अशा थाटानें वाढलेल्या वृक्षास जें फळ आलें तें योग्यच आहे!" असें ह्मणून पुढें चालला. जातां जातां ज्या वृक्षाखालीं ध्वजस्तंभ मोडून पडलेला **दुर्योधना**चा रथ त्याच्या सारथ्यानें आणून उभा केला होता तेथें येऊन तो पोंचला. त्या रथाला नानाविध रत्नें जडविलेलीं होतीं. त्यांच्यावर सूर्याचे किरण पडल्यामुळें हजारों इंद्रधनुष्यें चोहोंकडे पसरलीं आहेत असें दिसत होतें. अशा त्या रत्नखचित रथांत **दुर्योधन** विश्रांति घेत बसलेला पाहून **सुंदरकानें** जवळ जाऊन त्याला नमस्कार केला. त्याला पाहातांच अंगराज **कर्ण** खुशाल आहे ना ह्मणून **दुर्योधनानें** विचारिलें; तेव्हां **सुंदरक** ह्मणाला, "महाराज, तें

कांहीं विचारूं नका. तो शरीरानें मात्र खुशाल आहे; परंतु संग्रामांत **अर्जुनानें** त्याचा अगदीं पराजय करून टाकून त्याचा रथ भग्न केला त्याबरोबर त्याचे सर्व मनोरथही भग्न झाले, यामुळें निराश होत्साता अंगावरील कवच काढून व शस्त्रास्त्रांचा त्याग करून आत्मवधाचा निश्चय त्याणें या समयीं केला आहे." दुर्योधन ह्मणाला, "अरे, असें संदिग्ध भाषण करून अगोदरच दुःखित झालेल्या माझ्या अंतःकरणास अधिक दुःख देऊं नको. जिवावर उदार होण्यासारखें असें काय झालें तें सविस्तर सांग." **सुंदरक** ह्मणाला, "सांगतों ऐका महाराज, त्या **भीमसेनानें** कुमार **दुःशासना**चा वध केल्यामुळें **अंगराज** अत्यंत संतप्त होऊन त्याच्यावर चाल करून गेला. त्या वेळीं उभयपक्षांकडील सैन्यें एकमेकांवर बाणांचा वर्षाव करीत असल्यामुळें जिकडे तिकडे अंधकार पडून कोठें कांहींच दिसेनासें झा-

ले. त्या गर्दीमध्यें धनुष्यांचे टणत्कार होऊं लागले, व मधून मधून दोघे वीर भयंकर सिंहगर्जना करीत तेणेंकरून प्रलयकालच्या मेघांचा गडगडाटच होत आहे कीं काय असा भास होई. एकमेकांवर टाकलेल्या नानाविध शस्त्रास्त्रांचा कवचांवर आघात होऊन त्यांच्या घर्षणानें विस्तव पडे तो विद्युल्लतेप्रमाणें चमकूं लागला. शस्त्रांच्या घायांनीं त्यांच्या शरीरांतून रक्तबिंदु निघून वर उसळत ते जणूं काय काजवेच उडत आहेत असा भास होऊं लागला, आणि बाणांचा एकसारखा वर्षाव होत होता तो जलधारांप्रमाणें दिसूं लागला. सारांश, हें युद्ध नव्हे, तर प्रलयकालचें भयंकर दुर्दिनच होय असें सर्वांस वाटलें. अशा संधीस **भीमसेना**चा कदाचित् पराभव होईल ह्मणून **अर्जुन** रथांत बसून धांवत धांवत त्याच्या साह्यास आला. त्याच्या रथाच्या घोड्यांचें खिंखाळणें वज्रनिर्घोषा-

प्रमाणें भयंकर वाटूं लागलें. त्याच्या ध्वजस्तंभावर एक भला मोठा धष्टपुष्ट वानर बसलेला होता आणि स्वतः **श्रीकृष्ण** भगवान् आपल्या चार हातांत शंख, चक्र, गदा आणि खड्ग हीं आयुधें धारण करून रथ हांकीत होते. समरांगणांत रथ येऊन थडकतांच **अर्जुनानें** पांचजन्य शंखाचा आणि **श्रीकृष्णानें** देवदत्त शंखाचा भयंकर शब्द केला त्याच्या नादानें दशदिशा अगदीं दणाणून गेल्या. नंतर **कर्णाचा** पुत्र कुमार **वृषसेन** हा आपला पिता **भीमार्जुनांशीं** एकटाच लढत आहे असें ऐकून त्याच्या साह्यास धनुष्यबाण सज्ज करून व रथांत बसून समरांगणांत येऊन पोंचला. येतांक्षणींच त्यानें अति प्रखर आणि तेजस्वी अशा बाणांच्या वृष्टीनें जसा एकादा वृक्ष पुष्पांनीं भरून जातो त्याप्रमाणें **अर्जुनाचा** रथ आच्छादून टाकिला; तेव्हां **अर्जुनानें** त्याच्यावर तीक्ष्ण बाणांचा वर्षाव क-

रून ह्मटलें, "अरे **वृषसेना**, तुझ्या बापामध्येंही मजबरोबर सामना करण्याचें सामर्थ्य नाहीं; मग तुझी कथा काय? यासाठीं मागें फीर आणि आपल्या बरोबरीचे दुसरे कुमार पाहून त्यांच्याशीं युद्ध कर." हें भाषण ऐकून **वृषसेनास** राग आला; तथापि त्यानें कांहीं प्रत्युत्तर न देतां एक मर्मभेदक बाण सोडून **अर्जुनाचा** चांगला समाचार घेतला. नंतर त्याच्या तीक्ष्ण शरानें घायाळ झालेल्या **अर्जुनानें** रागास चढून आपलें गांडीवधनुष्य हातांत धरिलें, आणि वज्रपातासही लाजविणारा असा त्याचा भयंकर टणत्कार करून **वृषसेनावर** त्याणें बाणांचा वर्षाव चालविला. **वृषसेनानें**ही त्या प्रसंगीं अत्यंत चपलता करून **अर्जुना**लाही लाजविण्यासारखें युद्धकौशल्य दाखविलें. तें पाहून उभयसैन्यांतील वीर, 'शाबास वृषसेना, शाबास!' असें ह्मणत कांहीं वेळपर्यंत परस्प-

रांमधील वैरभाव एकीकडे ठेवून तो युद्धचमत्कार पाहात उभे राहिले. सर्व धनुर्धरांस लाजविणारा असा त्या बाळकाचा पराक्रम पाहून **अंगराजा**-ला अत्यंत हर्ष झाला; तथापि पुत्राविषयीं करुणा आणि भीति हे विकार एकदम त्याच्या अंतःकरणांत उद्भवले, आणि मोठ्या क्रोधावेशानें त्याणें शत्रूवर बाणांची वृष्टि करून पुत्राकडे बाष्पाकुल दृष्टीनें पाहिलें. नंतर **वृषसेना**ची सर्वतोमुखीं झालेली प्रशंसा ऐकून **अर्जुना**ला अत्यंत क्रोध आला, आणि बाणवृष्टि करून त्याणें त्याचे रथ, घोडे, सारथी, श्वेतध्वज, आणि धनुष्याची दोरी या सर्वांचा एकदम नाश केला. याप्रमाणें विरथ आणि शस्त्रहीन झालेला तो **वृषसेन** शत्रूचे बाण चुकविण्याकरितां मंडलाकार गरगर फिरूं लागला. इतक्यांत त्याच्या सेवकांनीं दुसरा रथ आणिला त्यावर चढून त्याणें **अर्जुना**वर पुनः चाल केली, आणि ‘ माझ्या ता-

ताची निंदा करणाऱ्या वाचाळा, आतां संभाळून राहा, ' असें ह्मणून मोठ्यानें सिंहनाद करीत हजारों बाणांनीं त्याचें शरीर अगदीं फुलवून टाकिलें. नंतर **अर्जुनानें** एक शक्ति **वृषसेनावर** टाकिली. ही शक्ति कांहीं सामान्य नव्हती. तिला घणघण शब्द करणारे सोन्याचे घुंगुर लाविले होते, व निरभ्र आकाश जसें लखलखित दिसतें तशी ती तेजस्वी दिसत होती, आणि तिचें मुख घांसून पाजवून तीक्ष्ण केलेलें होतें. अशी ती जाज्वल्य आणि भयंकर शक्ति कुमार **वृषसेनावर** येत आहे असें पाहून **अंगराजा**ची पांचांवर धारण बसून त्याच्या हातचें धनुष्य खालीं पडलें, वीरश्री नाहींशी झाली, डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या आणि तोंड अगदीं उतरून गेलें हें पाहून **अर्जुनानें** हास्य केलें, **भीमसेनानें** सिंहनाद केला, आणि कौरवसैन्यांत " घात झाला हो घात झाला, " अ-

सा एकच आक्रोश झाला तथापि त्या पराक्रमी कुमारानें लवमात्रही न डगमगतां भात्यांतून एक तीक्ष्ण बाण काढिला आणि तो आकर्ण ओढून त्या शक्तीवर इतका बिनचूक सोडिला कीं त्याणें तिचे अर्ध मार्गांतच, शिवानें **भागीरथी** जशी त्रिखंड केली तसे तीन तुकडे करून खालीं पाडिली. हें अद्भुत सामर्थ्य पापाहून सर्व वीरसमुदायांत 'शाबास **वृषसेना**, शाबास!' असा एकच ध्वनि उठला, व त्याबरोबरच सिद्ध, चारण, गंधर्व इत्यादिकांनीं त्या पराक्रमी कुमारावर आकाशांतून पुष्पवृष्टि केली, तिच्या योगानें सर्व समरांगण पुष्पमय होऊन गेलें. हा युद्धचमत्कार होत असतां **कर्ण** आणि **भीमसेन** आश्चर्यचकित झाले आणि परस्परांमधील वैरभाव क्षणमात्र विसरून जाऊन व युद्धव्यापार बंद ठेवून त्या दोघांचें धनुर्वेदनिपुणत्व कसें आहे तें पाहात कांहीं वेळ स्तब्ध राहिले.

**वृषसेनानें** त्या अमोघ शक्तीचे तुकडे केले असें पाहून **अर्जुनास** फारच त्वेष आला आणि तो मोठ्यानें गर्जना करून ह्मणाला, "अहो **दुर्योधन**प्रमुख सेनानायकहो, अरे अन्यायरूप नदीच्या कर्णधारा **कर्णा**, तुह्मीं सर्वांनीं मिळून, मी जवळ नसतां माझ्या **अभिमन्यु**बाळाचा वध केला, आणि मी तर आतां तुह्मां सर्वांदेखतां या **वृषसेना**ला नामशेष करून टाकितों, तुमच्यामध्यें सामर्थ्य असेल तर याला वांचवा." असें ह्मणून त्याणें आपलें **गांडिव**धनुष्य हातीं घेतलें आणि तें आकर्ण ओढून वज्रनिर्घोषाप्रमाणें त्याचा भयंकर टणत्कार केला. इकडे **अंगराजा**नेंही आपलें **कालपृष्ठ**नामक धनुष्य सज्ज केलें. याप्रमाणें एका बाजूस ते उभयतां पितापुत्र आणि एका बाजूस एकटा **अर्जुन** असे उभे राहून त्यांचा अत्यंत घोर संग्राम सुरू झाला. त्यामध्यें **अर्जुनानें** बाणवृष्टीचा एवढा कहर करून सो-

डिला कीं तिच्या योगानें जमीन अस्मान सर्व आच्छादून जाऊन कोणास कांहींच दिसेनासें झालें. वरचेवर धनुष्याचे टणत्कार ऐकूं येत होते एवढ्यावरून मात्र बाणांचा वर्षाव चालू आहे असें कळून येई. कांहीं वेळानें ती बाण-वृष्टि बंद होऊन पांडवसैन्यांतून आनंदाचा सिंहनाद आणि कौरवसैन्यांतून 'कुमार वृषसेन पडला हो पडला! असा एकच आक्रोश ऐकूं आला. नंतर पाहूं लागले तों त्या पराक्रमी बालकाचा रथ, सारथी, घोडे, छत्र, चामर, धनुष्य इत्यादि सर्वांचा विध्वंस होऊन, देवकुमाराचें जसें स्वर्गांतून पतन व्हावें त्याप्रमाणें एकच बाण मर्मीं लागून तो गतप्राण होत्साता रथांत पडला आहे असें दृष्टीस पडलें!"

हें दुःखकारक वर्तमान ऐकतांच **दुर्योधना**च्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या आणि तो ह्मणाला, "हा बाळा **वृषसेना**! हा **राधेय**-

वंशांकुरा ! हा गदायुद्धनिपुणा ! हा शौर्यसागरा ! बाळा, तू माझ्या मांडीवर नित्य खेळत असस. माझ्या आज्ञेबाहेर कधीं वागत नव्हतास. **दुःशासना**पेक्षांही तुजवर माझें प्रेम अधिक. असें असून मला सोडून आज कोणीकडे गेलास ! चंद्राप्रमाणें कांतिमान् व दीर्घनेत्रांनीं युक्त असें तुझें मुखकमल यौवनदशेला नुकताच आरंभ झाल्यामुळें फार रम्य दिसत असे, तें एकाएकीं गळून पडलेलें पाहून सख्या **अंगराजा**च्या मनाची काय स्थिति झाली असेल ! याप्रमाणें तो अत्यंत शोक करूं लागला. **सुंदरका**नें त्याचें सांत्वन केलें; तेव्हां तो ह्मणाला, "बाबा, तू कशाला सांत्वन करतोस ? आतां दुःखपात्रता माझ्या आंगीं राहिली आहे कोठें ? माझे सर्व बंधु व गणगोत यांच्या मरणजन्य दुःखाग्नीनें माझें हृदय अगोदरच इतकें करपून गेलें आहे कीं, इतःपर दुःख ह्मणजे कसें असतें तें समज-

ण्याची त्याच्यामध्यें पात्रताच राहिली नाहीं."
नंतर त्यानें **अंगराजा** काय करीत आहे ह्मणून विचारिलें; तेव्हां **सुंदरक** ह्मणाला, "महाराज, कुमार गतप्राण झाला हें पाहतांच तो ढळढळां रडून आक्रोश करूं लागला; पण लागलाच क्रुद्ध होऊन शत्रूकडील शस्त्रास्त्रांच्या माराची व आपल्या जीवाची कांहींच पर्वा नकरितां **अर्जुनावर** चवताळून गेला तों लागलेच **भीम, नकुल, सहदेव, पांचाल** आदीकरून वीर त्याच्या साह्यास आले. नंतर **अर्जुनानें** आपलें **गांडिव**-धनुष्य सज्ज करून प्रलयमेघांप्रमाणें हजारों शरधारांची वृष्टि केली तिच्या योगानें दशदिशा व्याप्त झाल्या. त्यांत **अंगराजाच्या** रथाचा अगदीं विध्वंस झाला; तेव्हां अशा स्थितींत **भीमार्जुनांशीं** युद्ध करणें योग्य नाहीं असें **शल्यानें** पुष्कळ प्रकारें समजावून सांगून समरांगणांतून त्यास माघारें फिरविलें. नंतर कांहीं वेळ

विश्रांति घेऊन त्यानें दुसरा रथ तयार करवून आणविला आणि त्यांत बसून तो समरांगणाकडे निघून गेला. जातांना त्यानें आपल्या मुकुटांतील एक सुवर्णपत्रिका काढून तीवर अंगांतून वाहात असलेल्या रक्तांत बाणाचें टोंक बुडवून कांहीं मजकूर लिहून आपणाकडे पाठविला आहे, तो हा वाचून पाहावा." असें ह्मणून त्यानें ती पत्रिका **दुर्योधनाच्या** हातांत दिली. **दुर्योधनानें** ती वाचून पाहिली. तींत असें लिहिलें होतें कीं, "सर्व शस्त्रास्त्रविद्येंत माझ्या बरोबरीचा वीर पृथ्वीच्या पाठीवर कोणी नाहीं व मी **पांडवांस** मारीन असा तुला पूर्ण भरंवसा होता; पण तें सर्व व्यर्थ झालें; इतकेंच नव्हे; तर **दुःशासनाचें** संरक्षणही माझ्या हातून झालें नाहीं; तेव्हां मी जिवंत असून मेल्यासारखाच झालों. आतां शौर्यानें किंवा अश्रूंनीं दुःखाचें परिमार्जन कर." हा मजकूर वाचून दुःखावर डाग दिल्याप्रमाणें **दुर्योधनास**

अतिशय वाईट वाटलें आणि त्याणें **सुंदरका**-बरोबर **कर्णाला** असा निरोप पाठविला कीं, " मित्रा **कर्णा**, झाल्या गोष्टीचा तू खेद मानूं नको. **वृषसेन** कोण आणि **दुःशासन** कोण? असे निरोप पाठवून माझ्या घायाळ झालेल्या हृदयावर प्रहार करूं नको. तू जीवाची आशा सोडून समर करावयास जात आहेस, तर माझाही तसाच निश्चय आहे; यासाठीं आपण दोघेही रणभूमीवर जाऊन प्रथम **पांडवांस** मारूं आणि मृतबंधुवर्गास तिलांजलि देऊन तृप्त करूं. हें नच झालें तर अवशिष्ट राहिलेले जे मंत्री, आप्तजन व इष्टमित्र यांच्यासह बाष्पजलानें दुःखाचें परिमार्जन करूं आणि शेवटीं तू आणि मी उभयतां एकमेकांस शेवटचें दृढालिंगन देऊन या दुःखभाक् शरीराचा त्याग करूं."

हा **दुर्योधनाचा** निराशेचा निरोप घेऊन

**सुंदरक कर्णा**कडे गेला. इकडे **दुर्योधनानें** दु-
सरा रथ तयार करवून आणविला, आणि सम-
रांगणाकडे जाण्याच्या तयारीस लागला तों
**धृतराष्ट्र** व **गांधारी** हीं उभयतां **दुःशासन**
मरण पावला हें वर्तमान ऐकून **संजया**सहवर्त-
मान रथांत बसून आपल्या भेटीस येत आहेत
असें त्यास समजलें; तेव्हां त्याला फार वाईट
वाटलें आणि तो ह्मणाला, "अरेरे, हें मोठेंच
संकट प्राप्त झालें. आतां या वृद्ध मातापितरांना
म्यां तोंड तरी कसें दाखवावें! आज प्रातःकाळीं
मी आणि **दुःशासन** उभयतां त्यांना वंदन
करून समरांगणांत गेलों त्या वेळेस त्यांणीं
आह्मांस पोटाशीं धरून आमच्या मस्तकांचें
अवघ्राण केलें व आह्मांस आशीर्वाद दिले. त्या
बालकाचा तर शत्रूनीं घात केला. तेव्हां आतां
जर त्यांणीं तो कोठें आहे ह्मणून विचारिलें तर
म्यां काय सांगावें." अशा विवंचनेंत तो पडला

असतां तीं वृद्ध मातापितरें तेथें येऊन पोंचलीं. येतांच त्यांणीं **संजयास** विचारिलें, "वत्सा, **संजया**, या कुरुकुलकाननाचा माझ्या दुर्दैवानें विध्वंस तर झालाच; पण त्यांत अवशिष्ट राहिलेला जो दुर्योधन बालतरु तो तरी खुशाल आहे काय? असेल तर कोठें आहे तो आह्मांस दाखीव." **दुर्योधन** खिन्न आणि लज्जित होऊन मुकाट्यानें बसला होता. त्याच्याजवळ **संजयानें** त्या ह्मातार्‍यांस नेलें. त्यांणीं त्याच्या अंगास स्पर्श करून ह्मटलें, "बाळा **दुर्योधना**, अति तीक्ष्ण प्रहरांनीं व्याकुल झालास ह्मणून आमच्याशीं बोलत नाहींस काय? किंवा तुझ्या शरीरांतील शल्यें चिमट्यानें उपटून काढून क्षतांवर मलमपट्ट्या लावून तू निजलास असतां तुला कसें काय वाटतें असें आह्मीं निर्दयांनीं विचारिलें नाहीं ह्मणून रुसलास, झालें तरी काय? वत्सा, यापूर्वी तूं आमच्या-

शीं असा अबोला कधींच धरला नाहीं, आणि आजच कांरे बा असें. बाळा या समयीं जर तू आह्मांशीं बोलला नाहींस तर **दुःशासन, दुर्मर्षण**, किंवा दुसरा कोणी येऊन बोलणार आहे काय ? " असें ह्मणून तीं वृद्ध मातापितरें ढळढळां रडूं लागलीं. त्यांचा तो विलाप पाहून **दुर्योधन** ह्मणाला, " अहो तात, अग आई, मी कोणत्या तोंडानें तुह्मांजवळ बोलावें ? माझ्या सर्व भ्रात्यांचा नाश प्रत्यक्ष माझ्या डोळ्यांदेखत झाला असून त्याचें निवारण माझ्या हातून न होतां आज मी तुमच्या अश्रुपातास कारण झालों आहें; तेव्हां भ्रातृहत्येच्या पातकानें निर्मल भरतकुलाला कलंक लावणाऱ्या या कुपुत्राला 'बाळा बाळा, वत्सा वत्सा ' असें वारंवार कशाला ह्मणतां ? हें भाषण ऐकून **गांधारी**ला अतिशयच गंहिवर आला, आणि पुत्रशोकानें जरी ती अत्यंत व्याकुल झाली होती तरी तें दुःख

क्षणभर एकीकडे ठेवून व क्षात्रधर्मास विसरून जाऊन अत्यंत दीन होत्साती ती ह्मणाली, "बाळा, असा कष्टी होऊं नको. आह्मां दोघां आंधळ्यांना वाट दाखविणारा तूच काय तो एकटा उरला आहेस; तेव्हां तू जिवंत आहेस हेंच आह्मी आपलें महद्भाग्य समजतों. आह्मांला आतां तें राज्य नको आणि कोणाशीं वैरही नको. तुझ्याकडे पाहून आह्मी आपलें आयुष्य सुखानें चालवूं." धृतराष्ट्रही ह्मणाला, "**सुयोधना**, आतां आमचें तुझ्याजवळ हात जोडून एवढेंच मागणें आहे कीं, सांप्रत आपणाला काल अनुकूल नाहीं; यासाठीं युद्ध करण्याचा हेका सोडून दे आणि त्या **युधिष्ठिरा**ला राज्याचा योग्य विभाग देऊन त्याच्याशीं संधि कर; कारण जे आपल्या शौर्यावर भरंवसा ठेवून **पांडवां**ना कसपटाप्रमाणें मानीत होते ते **भीष्मद्रोणा**दि पराक्रमी वीर सर्व मरण पावले. **वृषसे-**

नाचा **अर्जुनानें** वध केला त्या वेळेस **कर्णा**सारख्या वीराचेंही कांहीं न चालतां सर्व सैन्याचा भयानें थरकांप झाला, असा ज्या **पांडवां**चा पराक्रम त्यांणीं तुमच्या सर्वांच्या वधाची केलेली प्रतिज्ञा बहुतेक शेवटास नेली. आतां तूच काय तो एकटा उरला आहेस; यासाठीं आह्मां आंधळ्यांकडे पाहून हा युद्धाचा व्यर्थ नाद सोडून दे आणि स्वस्थ राहा." इतक्यांत **संजय**ही पुढें येऊन हात जोडून ह्मणाला, "महाराज, आपणास तात आणि मातुश्री जो उपदेश करीत आहेत तो चांगला आहे. त्याप्रमाणें आपण वागलां तर त्यांत कल्याण आहे." याप्रमाणें सर्वांचीं भाषणें ऐकून घेतल्यावर **दुर्योधन** ह्मणाला, "अहो तात, स्त्रीस्वभावाप्रमाणें पुत्रमोहास वश होऊन आई बोलली तें ठीकच आहे. हा **संजय** तर बोलून चालून गांवढळ याला राजनीतीचें ज्ञान कोठून असणार? पण तुम-

च्याही ठिकाणीं एवढें अज्ञान असावें याचें मला मोठें नवल वाटतें. कदाचित् पुत्रनाशजन्य संतापाच्या भरांत तुह्मी असें बोललां असाल; पण विचार करा कीं, माझे शंभर भ्राते जिवंत होते त्या वेळीं प्रत्यक्ष **श्रीकृष्ण** संधि करावयास आले असून त्यांचें मीं ऐकिलें नाहीं. आतां तर सर्व भ्राते, **भीष्मद्रोणा**दि महावीर आणि सर्व साह्यकर्ते राजे माझ्या करितां मरण पावले. अशा वेळेस या तुच्छ आणि क्षणभंगुर देहाच्या लोभास्तव, थोरांनीं उपहास करण्यासारखा व परिणामीं दुःख देणारा असा संधि मीं पांडवांशीं करावा हें आपणास योग्य वाटतें काय? बरें इतकेंही असून मी तुमच्या उपदेशाप्रमाणें वागलों, तरी **पांडव** आतां संधीची गोष्ट कदापि ऐकणार नाहींत; कारण बलहीन आणि पराजित झालेल्या पक्षाबरोबर बलवान् आणि विजयी पक्ष काय ह्मणून संधि करील?" हें

भाषण ऐकून **धृतराष्ट्र** ह्मणाला, "वत्सा **दुर्योधना,** तू ह्मणतोस तें सारें खरें; तथापि मी सांगितलें असतां **युधिष्ठिर** ऐकणार नाहीं असें नाहीं. दुसरें कारण असें आहे कीं, त्याच्या भावांतून एकजण जरी मरण पावला तरी तो प्राणधारण करणार नाहीं अशी त्याची प्रतिज्ञा आहे, आणि समरामध्यें मृत्यूची धाड कोणावर येईल याचा नेम नसल्यामुळें तो निरंतर काळजींतच आहे; यासाठीं तुला पाहिजे तसा संधि करण्यास तो अजूनही तयार होईल अशी माझी खातरी आहे." हें ऐकून **दुर्योधन** ह्मणाला, "अहो, तुमच्याच बोलण्यानें न्याय झाला. **युधिष्ठिरा**ची जर अशी प्रतिज्ञा आहे तर माझे शंभर भ्राते मरण पावले असून **दुःशासना**चें रुधिर प्राशन करणाऱ्या त्या दुष्ट शत्रूचा मस्तक या गदेच्या तडाक्यानें संचूर्ण न करतां म्यां जिवंत राहावें आणि एकाद्या भिकारड्या-

प्रमाणें **पांडवां**जवळ याचना करावी हें तुह्मां-स चांगलें वाटतें काय? अशा वर्तनानें लोक आमच्या तोंडावर थुंकणार नाहींत काय? मा-झा तर निश्चय आहे कीं जीव गेला तरी बे-हेत्तर; पण असें लज्जास्पद वर्तन मी कधीं करणार नाहीं." याप्रमाणें त्याचें तें दुराग्र-हाचें आणि अभिमानाचें भाषण ऐकून त्याच्या अंध मातापितरांस फार दुःख झालें. त्यांना वाटलें कीं, आमच्या पोटीं उत्पन्न झालेले हे शंभर पुत्र नव्हत; तर शंभर दुःखांची ही मा-लिकाच जन्मास आली! आणि आपल्या मृत-पुत्रांच्या नांवांनीं हाका मारून तीं ढळढळां रडूं लागलीं. **संजयानें** त्यांचें अनेक प्रकारांनीं सांत्वन केलें. शेवटीं **धृतराष्ट्र** ह्मणाला, "व-त्सा **सुयोधना**, तू आपला हेका व दुरभिमान सोडीत नाहींस येणेंकरून आह्मांला आतां सु-खाचे दिवस पाहण्याची आशा करावयास न-

कोच; पण तुझ्या एकट्याच्या तोंडाकडे पाहून सुख मानणाऱ्या या तुझ्या हतभाग्य मातेनें आतां कोणाच्या आश्रयास राहावें आणि म्यां आंधळ्यानें तरी कोणती आशा धरून हा दुःखमय आयुष्यमार्ग क्रमावा बरें?" याप्रमाणें भाषणें चाललीं असतां समरभूमीकडे रणवाद्यें एकाएकीं वाजूं लागलीं व त्यांबरोबर एकच मोठा हलकल्लोळ झाला, त्यावरून हें कांहीं तरी नवेंच संकट दुर्दैवानें प्राप्त झालें असावें असें **दुर्योधनानें** जाणून समरांगणाकडे जाण्याविषयीं त्याणें **धृतराष्ट्रा**जवळ आज्ञा मागितली. युद्धाविषयीं त्याचा दृढनिश्चय पाहून, शत्रूचा नाश गुप्त रीतीनें तरी करण्याची कांहीं योजना कर असें **धृतराष्ट्रानें** त्यास सुचविलें; परंतु **दुर्योधन** ह्मणाला, "माझ्या डोळ्यांदेखत ज्यांणीं माझे शंभर भ्राते मारिले त्या शत्रूंचा नाश कपटानें करून मी आपणास भेकड ह्मणवून

कधीं घेणार नाहीं. मी एकटा असलों ह्मणून काय चिंता आहे. दैव अनुकूळ असेल तर आजच्या आजच पृथ्वी निःपांडवी करून टाकीन!"

वरील संवाद चालला असतां तिकडे समरांगणांत **अर्जुन** आणि **कर्ण** यांचें मोठें घनघोर युद्ध जुंपलें होतें, त्यांत **कर्णा**च्या रथाचें चाक भूमीमध्यें रुतून गेलें. तें वर काढण्याकरितां तो खालीं उतरला. ही संधी पाहून **अर्जुनानें** बाण मारून त्याचा वध केला व त्याचा सारथी **शल्य** यालाही बाणांच्या तडाख्यांनीं घायाळ केलें; तेव्हां रिकामा रथ घेऊन **शल्य** शिबिरामध्यें परत आला, हें वर्तमान कोणीं जासुदानें येऊन **दुर्योधनास** कळविलें. भ्रातृवधाच्या दुःखानें तो अगोदरच व्याकुळ झाला होता, तशांत हा नवीन पडलेला घाला त्याच्या कानीं येतांच तो मूर्च्छित होऊन धाडकन् खालीं प-

डला. **धृतराष्ट्र**ही तें वर्तमान ऐकतांच कपाळावर हात मारून ह्मणाला, "हायहाय! **भीष्मद्रोणां**च्या मागें ज्याच्यावर आमची सर्वांची भिस्त होती व जो माझ्या **सुयोधना**चा परममित्र तो **राधेय**ही शेवटीं आह्मांस फसवून गेला ना? हर हर! केवढा दुर्धर प्रसंग हा! दुर्दैवा, तुझ्या निर्दयपणाची कमाल झाली! अरे, एक नाहीं, दोन नाहीं. शंभर पुत्रांच्या मरणाचें दुःख या दीन आंधळ्यास अनुभवावयास लावून तेवढ्यानेंही तृप्त न होतां शेवटीं राहिलेल्या या एका वंशांकुरावर देखील तुझा वांकडा डोळा! याप्रमाणें विलाप करीत तो **दुर्योधनास** सावध करूं लागला. थोड्या वेळानें देहभानावर येतांच तो **कर्णा**चें प्रेम आठवून ह्मणाला, "हायरे मित्रा, मला टाकून तू एकटाच कोणीकडे गेलास! माझ्याशीं एकवार तरी भाषण कर. **वृषसेना**वर तुझें अधिक प्रेम ह्मणून माझा त्याग

करून त्याच्या भेटीस गेलास काय? प्राणसख्या, तुजवांचून म्यां हें आयुष्य आतां कसें घालवावें." याप्रमाणें शोक करीत असतां त्याला पुनः मूर्च्छा आली. सर्वांनीं त्याला पुनः सावध केल्यावर तो ह्मणाला, "अहो, तुह्मी मला आतां सावध कशासाठीं करितां? प्राणापेक्षांही अधिक प्रिय जो माझा **अंगराज** तो देवाधीन झाला असतां मला निर्लज्जासारखें जिवंत राहून तरी काय कर्तव्य आहे? तथापि मी जिवंत राहिलोंच तर एवढें खचित करीन; सख्या **अंगराजाला** मारून ज्याणें मला शोकसागरांत ढकललें त्याचा निर्वंश केल्यावांचून मी कधीं राहाणार नाहीं; कारण त्या मित्राच्या मुखेंदूचें स्मरण झालें ह्मणजे माझा क्रोधाग्नि भडकून तो त्या शोकसागराला वडवाग्नीप्रमाणें खाऊन टाकितो कीं काय असें वाटतें. दुःशासनादि माझे भ्राते रणांत पडले त्याचें मला कांहींच दुःख

वाटत नाहीं; पण **अंगराजाच्या** मरणापासून उत्पन्न झालेल्या शोकाग्नीनें माझें अंतःकरण इतकें होरपळून गेलें आहे कीं, त्या वेदना माझ्याच्यानें सहन करवत नाहींत आणि मरण येईल तर बरें असें वाटतें." हें भाषण ऐकून **धृतराष्ट्र** ह्मणाला, "वत्सा, तू असा निराश होऊनही युद्ध करण्याचा आपला हेका सोडीत नाहींस व उगीच आपला जीव संकटांत घालीत आहेस, हें कांहीं चांगलें नव्हे; कारण, त्या भयंकर **भीमसेना**ला पाहून माझ्या हृदयाचा थरकांप होतो; आणि तुला मारण्याची आपली प्रतिज्ञा तो शेवटास नेईल कीं काय असें भय वाटतें. **पांडवां**चा युद्धव्यापार पाहिला तर अत्यंत कपटाचा आहे आणि तू सरलमार्गानें युद्ध करणारा; तशांतून त्या **वृकोदरा**बरोबर झगडून तुला यशप्राप्तीची आशाच धरावयास नको." **दुर्योधन** ह्मणाला, "**वृकोदरा**ची गोष्ट सध्या एकीकडे असूं द्या. मा-

झ्या नयनांला चंद्राप्रमाणें आणि शरीराला चंदनरसाप्रमाणें सुखशांति देणारा व ज्याचा मला मुख्यत्वेंकरून आधार तो माझा प्राणमित्र ज्यानें कपटानें मारिला त्या दुष्टाचें प्रथम मला कांडात काढिलें पाहिजे. " हें त्याचें निकराचें भाषण ऐकून **धृतराष्ट्र** ह्मणाला, " वत्सा, या तुझ्या साहसानें आह्मांला शोकाग्नींत जाळण्याचा जर तुझा निश्चय झाला असेल तर **शल्य, अश्वत्थामा**, अथवा दुसरा कोणी पराक्रमी वीर निवडून त्याला सैनापत्याचा अभिषेक कर, एवढें तरी माझें ऐक. " **दुर्योधन** ह्मणाला, " ताता, तुह्मांला एकच सांगतों, मी आज **पार्थाचे** प्राण हरण करीन; नाहीं तर कर्णाच्या भेटीस जाईन अशी प्रतिज्ञा करून या अश्रुजलानें आपणा स्वतालाच सैनापत्याचा अभिषेक केला आहे; तेव्हां मला **शल्याची** गरज नाहीं अथवा **अश्वत्थाम्याचीही** गरज नाहीं. " असें ह्मणून गदा घेऊन

समरभूमीकडे जाण्याचा त्यानें निश्चय केला.

**भीमसेनानें दुर्योधनाच्या** मांडीचा गदाप्रहारानें चुराडा करण्याची प्रतिज्ञा केली होती हें वाचकांच्या लक्षांत असेलच. ती प्रतिज्ञा शेवटास नेण्याकरितां **अर्जुनाला** बरोबर घेऊन तो **दुर्योधनाचा** शोध करीत चालला असतां त्याला पाहून कौरवसैन्य भयानें चोहोंकडे पळत सुटलें; तें पाहून मोठ्यानें ओरडून तो ह्मणाला, "अहो वीरजन हो! तुह्मी आह्मांस पाहून पळूं नका. आमच्यापासून तुह्मांला यत्किंचितही उपद्रव होणार नाहीं. आह्मांला एवढेंच सांगा कीं, ज्यानें आह्मांस लाक्षागृहांत कोंडून जाळून मारण्याचा प्रयत्न केला, ज्यानें कपटद्यूत खेळून आह्मांस दास बनविलें, ज्यानें **दुःशासनाकडून पांचालतनयेचे** केश आणि वस्त्र ओढवून तिचा अपमान केला, जो **दुःशासनादि** शंभर कौरवांतील ज्येष्ठ आणि **कर्णाचा** मित्र तो दांडगा

**दुर्योधन** कोठें आहे." याप्रमाणें ओरडत ओरडत ज्या वटवृक्षाखालीं **दुर्योधन** बसला होता तिकडे तो जाऊं लागला. त्याला दुरून येतांना पाहून सारथ्यानें **दुर्योधनास** ती खबर कळविली; तेव्हां **धृतराष्ट्र** व **गांधारी** यांच्या तोंडचें पाणी पळालें; पण **दुर्योधन** हातांतील गदा सरसावून त्याच्याशीं सामना करण्यास तयार झाला. त्या उभयतां वृद्धांना तेथें आलेलीं पाहून **अर्जुन भीमसेनास** ह्मणाला, "दादा, पुत्रशोकानें व्यथित झालेल्या या ह्मातार्‍यांच्या दृष्टीस जर आपण पडलों तर त्यांना अधिकच दुःख होईल; यासाठीं आपण येथून परत जावें हें बरें." **भीमसेन** ह्मणाला, "**अर्जुना** वेड्या, तुला समजत नाहीं. वडील माणसांची गांठ पडली असतां त्यांना वंदन केल्याशिवाय जाणें शिष्टाचारास विरुद्ध आहे; यासाठीं आपण कोण काय हें त्यांना कळवून वंदन केलेंच पाहिजे." तेव्हां अर्जु-

**न** बरें ह्मणून प्रथम पुढें गेला आणि ह्मणाला. "अहो **धृतराष्ट्र**काका, अहो **गांधारी**काकूबाई, शत्रूंना जिंकण्याविषयीं तुमच्या पुत्रांचा ज्याच्यावर पूर्ण भरंवसा होता व जो गर्वानें सर्वांस तृणासमान मानीत असे, त्या **राधेयास** रणांगणांत मारणारा मी मधला पांडव **अर्जुन** तुह्मांस नमस्कार करितों." नंतर **भीमसेन** पुढें होऊन ह्मणाला, "अहो, ज्यानें तुमच्या शंभर पुत्रांचें कांडात काढून त्यांस यमसदनास पाठविलें, ज्यानें **दुःशासनास** मारून त्याच्या छातींतील रक्ताचें पान केलें आणि जो आतां **दुर्योधना**च्या मांडीचा चुराडा करून आपली प्रतिज्ञा लवकरच परिपूर्ण करण्यासाठीं येथें प्राप्त झाला आहे तो मी **भीमसेन** तुह्मांस वंदन करितों." हें **भीमाचें** दांडगेपणाचें भाषण ऐकून **धृतराष्ट्रास** संताप आला आणि तो ह्मणाला, "दुष्टा **वृकोदरा**, कशाला उगीच एवढी बडबड करून आह्मांस दुः-

ख देत आहेस ? शत्रूचा नाश करून तूच एकटा या जगांत विजयी झालास असें समजूं नको. लढाईंत शत्रूला मारावें किंवा मरावें हीं दोन्ही कर्मे क्षत्रियांना श्रेयस्करच आहेत; मग तूं एवढी फुशारकी कशाला मिरवितोस ?" **भीमसेन** अंमळ शांत होऊन ह्मणाला, "महाराज, आपण रागावूं नका. मी हें उमेटपणानें किंवा भुजबळाच्या गर्वानें बोलतों असें नाहीं; तर **द्रौपदी**चा भरसभेंत अपमान करण्यास जे जे दुरात्मे प्रवृत्त झाले, अथवा ज्यांणीं ज्यांणीं त्या निंद्यकर्मास अनुमोदन दिलें त्या सर्वांची तिच्या क्रोधाग्नींत राखरांगोळी होऊन तर गेलीच; पण तुह्मी तें कर्म उदासीनपणें पाहात राहिलां ह्मणून बोलतों." **दुर्योधन** हें भाषण ऐकत होताच. वडील माणसांच्या देखत आपल्या निंद्यकर्माची बढाई मिरविलेली त्याला सहन न होऊन तो गदा घेऊन रागानें **भीमसेना**च्या अंगावर धांवून

गेला, आणि ह्मणाला, " मूर्खा वायुपुत्रा, तुझ्या बायकोला दासी करून सभेमध्यें ओढीत आणिली ती केवळ माझ्या आज्ञेनें; पण माझें तुझ्याच्यानें कांहींच वांकडें होत नाहीं; असें जाणून 'वड्याचें तेल वांग्यावर काढावें' त्याप्रमाणें त्या गरीब बिचाऱ्या राजांस आणि **दुःशासनास** त्वां दुष्टपणानें मारिलें, यांत पुरुषार्थ तो कोणता केला? आणि असलें निंद्य कर्म करून तें लोकांत सांगत फिरण्यास तुला लाज कशी वाटत नाहीं?" हें भाषण ऐकून **भीमसेन**ही फार संतापला आणि गदा घेऊन **दुर्योधना**च्या अंगावर चवताळून धांवला. दोघेही हातघाईवर आलेले पाहून **धृतराष्ट्रानें** **दुर्योधनास** हातानें धरून खालीं बसविलें आणि **अर्जुनानें** **भीमसेनास** शांत करून ह्मटलें, "दादा, भ्रात्यांच्या मरणानें दुःखित होऊन हा जी बडबड करीत आहे तिजकडे तुह्मी कशाला लक्ष देतां? याच्या हातून काय व्हावयाचें

आहे ?" तेव्हां **भीमसेन** जरासा शांत होऊन **दुर्योधनास** ह्मणाला, "मूर्खा भरतकुलकलंका, जर या वेळेस हीं वडील माणसें जवळ नसतीं तर या गदेच्या प्रहारानें तुझीं हाडें मोडून तुला **दुःशासना**च्या भेटीस पाठविलें असतें. बायको-प्रमाणें रडावयास लावून **दुःशासना**च्या रुधिरपानाचा सोहळा तुला दाखवावयाचा होता, ह्मणूनच आजपर्यंत तुला जिवंत ठेविलें; नाहीं तर या क्रुद्ध झालेल्या **भीमसेना**च्या क्रोधाग्नींत कधींच जळून खाक झाला असतास !" **दुर्योधन** पुनः चवताळून त्याच्या अंगावर धांवला आणि ह्मणाला, "अरे दुरात्म्या भरतकुलाधमा, द्यूतदासा, पांडवपशो ! आतांच तुला या रणांगणांत लोळवून तुझें वक्षस्थळ फोडून त्यांतील रक्तानें तुला स्नान घालितों पहा !" याप्रमाणें उभयतांचा वाक्कलह चालला असतां सायंकाळचा समय जवळ आला; ह्मणून **धर्मराजानें**

आपल्या सैन्यांत अशी वर्दी फिरविली कीं, "शत्रूच्या अस्ताबरोबर **सूर्यनारायण**ही अस्तास चालला आहे; यास्तव रणांत जे वीर मरण पावले असतील त्यांच्या आप्तांनीं त्यांस अग्नि देऊन अश्रुमिश्रित जल कसें तरी समर्पण करावें, व गृध्रकंकादि पक्ष्यांनीं जीं प्रेतें छिन्नभिन्न केलीं असतील त्यांचा शोध करून त्यांचीही व्यवस्था लावावी आणि सर्व सैन्यांनीं आपापल्या छावणींत विश्रांति घेण्याकरितां जावें." ही धर्माज्ञा **भीमार्जुनां**च्या कानीं येतांच ते **दुर्योधना**ला तेथें तसाच सोडून आपल्या शिबिराकडे परत निघून गेले.

इतक्यांत पितृवधामुळें ज्याचा कोपानल प्रदीप्त झाला आहे, जो धनुर्विद्येमध्यें बापापेक्षांही अधिक निष्णात आणि पराक्रमानें केवळ देवांची बरोबरी करणारा असा **अश्वत्थामा अर्जुना**चा शोध करीत त्या ठिकाणीं आला. येतां-

येतां तो मोठ्यानें असें ओरडत सुटला कीं, "अरे **गांडिवधनुष्य** धारण करणाऱ्या **अर्जुना**, **कर्णा**वर रुसून मीं शस्त्रत्याग केला हें जाणून निर्वीर झालेल्या रणांगणांत तूं आपल्या पराक्रमाची प्रौढी मिरवीत होतास, आणि माझा पिता शोकामुळें निःशस्त्र झालेला पाहून त्या **द्रुपदपुत्रानें** त्याचा मस्तक छेदिला! असो, चिंता नाहीं! आतां त्या दुष्टाला आणि तुम्हां सर्वांना तुमच्या सेनेसहवर्तमान जाळून भस्म करण्यासाठीं हा मी **अश्वत्थामा** कल्पाग्नि होऊन आलों आहें. आतां माझ्या हातून तुम्ही कसे सुटतां तें पाहातों." **भीमार्जुन** जरी तेथून निघून गेले होते तरी हें त्वेषयुक्त वीरश्रीचें भाषण ऐकून **धृतराष्ट्रास** परम हर्ष होऊन मोठी उमेद आली, आणि त्याला सामोरा जाऊन त्याचा सत्कार करण्याविषयीं त्याणें **दुर्योधनास** सांगितलें; परंतु **दुर्योधनाचें** मन त्या-

च्याविषयीं अगोदरच कलुषित झालेलें होतें; ह्मणून तो ह्मणाला, " अहो तात, यौवन, बल, आणि शस्त्रास्त्रविद्यापटुत्व यांची वृथा प्रौढी मिरविणाऱ्या या द्रोणपुत्राचें खरोखर मला तोंड देखील पाहावयास नको. कर्णाच्या प्राणावर प्रसंग आला असून याणें त्याचें संरक्षण केलें नाहीं असा हा अवसानघातकी; तस्मात् याला धिक्कार असो!" असें बोलतो आहे तों अश्वत्थामा जवळ येऊन पोंचला. आणि दुर्योधनाचा जयजयकार करून ह्मणाला, " राजा, त्या राधेयानें गोड गोड व मोठ्या शूरत्वाच्या गोष्टी सांगून शेवटीं आपल्या पराक्रमाचा काय उजेड पाडिला तो आपणाला समजलाच आहे! असो; तथापि मी आतां धनुष्य हातीं धरून आलों आहें, तेव्हां तुला इतःपर कांहीं काळजी करावयास नको." हें मर्मभेदक भाषण दुर्योधनाला अर्थांतच रुचलें नाहीं, आणि तो ह्म-

णाला, "गुरुपुत्रा, **राधेया**च्या मरणाची तू वाटच पाहात होतास, तसा मीही मरेतोंपर्यंत स्वस्थ राहा; कारण तो आणि मी उभयतां एकच आहों, आणि मग आपला पराक्रम खुशाल हवा तसा गाजीव." हें **कर्णा**विषयीं पक्षपाताचें व आपणाविषयीं तिरस्कारबुद्धीचें भाषण ऐकून **अश्वत्थाम्या**स फार वाईट वाटलें आणि तो आला तसाच तेथून परत निघून गेला. **धृतराष्ट्रा**लाही तो रुसून गेला हें पाहून फार खेद झाला; कारण, त्याला यापुढें आशा काय ती **अश्वत्थाम्या**चीच होती; यासाठीं त्याणें त्याची समजूत करण्याकरितां **संजया**स पाठविलें आणि **गांधारी**सहवर्तमान आपण **शल्या**च्या डेऱ्यांत निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं **दुर्योधना**नें नवा रथ आणवून संग्रामास जाण्याची तयारी केली. त्याच्या बहुतेक सैन्याचा व मोठमोठ्या वीरांचा नाश

झाला होताच; तथापि राहिलेलें सैन्य एकत्र करून व मद्राधिपति **शल्याला** सेनापतीचा अधिकार देऊन त्यानें पांडवांशीं युद्ध सुरू केलें. त्यांत धर्मराजानें मोठा पराक्रम करून **शल्याला** मारिलें; तेव्हां साऱ्या सैन्यानें पळ काढिला, त्या धांदलींत **दुर्योधन** कोणीकडे पळून गेला त्याचा ठिकाण लागेना; यामुळें **धर्मराज** मोठ्या काळजींत पडला; कारण **भीमसेनानें** त्या दिवशीं त्याला मारीन किंवा मी मरेन अशी घोर प्रतिज्ञा केली होती, ती तो नाहींसा झाल्यामुळें शेवटास जाणें अशक्य झालें; तेव्हां दुःखाचा सुस्कारा टाकून **धर्मराज** ह्मणाला, " हाय हाय आतां काय करावें ! **भीष्मरूप** महार्णवांतून आह्मी आपल्या बाहुबळानें तरून गेलों, **द्रोणरूप** प्रलयाग्नि कसा तरी शांत केला, **कर्णरूप** विषारी भुजगास मारिलें, आणि त्या मद्राधिपति पराक्रमी **शल्याचाही** शेवटीं नाश केला. इतकें झालें तरी **भीम-**

**सेना**ची दारुण प्रतिज्ञा अद्यापि पूर्ण होणें राहिली आहे. ती जर तशीच राहिली तर तो खचित प्राण ठेवणार नाहीं. मग आमची सर्वांची तीच दशा होणार! **द्रौपदी**ही त्याचा जीव संकटांत पडलेला पाहून फार शोक करूं लागली तिचें समाधान करून **धर्मराजानें सहदेवास** जवळ बोलाविलें आणि सांगितलें कीं, चांगले माहितगार आणि आमचें हित इच्छिणारे असे लोक निवडून काढून त्यांच्या द्वारें समरभूमीच्या असमंतात् भागीं **दुर्योधना**चा शोध करवा. अशी आज्ञा होतांच त्याणें चोहोंकडे जासूद रवाना केले व रानावनांत, दऱ्याखोऱ्यांत, वाळवंटांत, तापसी जनांच्या आश्रमांत वगैरे सर्व ठिकाणीं त्याचा शोध करण्याविषयीं ताकीद दिली व जो त्याचा थांग लावून देईल त्याला मोठें इनाम मिळेल अशी दवंडी पिटविली.

इकडे समरांगणामध्यें कौरवसैन्याची अगदीं

वाताहत होऊन **कृपाचार्य अश्वत्थामा** आणि **कृतवर्मा** या तिघांवांचून कोणीही वीर जिवंत राहिला नाहीं. सैन्याला कोणीच आवरणारा नसल्यामुळें ज्याला जिकडे वाट दिसली तिकडे तो पळत सुटला, याप्रमाणें एकच धांदल उडून गेली. त्या गडबडींत **दुर्योधनानें** जो पोबारा केला तो समरभूमीपासून बऱ्याच अंतरावर एक सरोवर होतें त्यांत जाऊन तो दडून बसला. **भीमसेना**चा त्याच्यावर डोळा होता तरी तो केव्हां व कोणीकडे गडप झाला हें त्याला समजलें नाहीं; तेव्हां भगवान् **श्रीकृष्ण** व **भीमार्जुन** हे त्रिवर्ग एका रथांत बसून आसमंतात् भागीं त्याचा शोध करूं लागले. **दुर्योधन** नाहींसा झाल्यामुळें **भीमसेना**ची प्रतिज्ञा शेवटास जाते कशी याची **अर्जुनास** काळजी पडली, आणि **श्रीकृष्ण** परमात्मा दैवाच्या करणीस दोष देऊं लागले. **भीमसेन** तर आपली प्रतिज्ञा शेवटास

नेण्याविषयीं उतावीळ होत्साता, शत्रु कोठें दृष्टीस पडेना ह्मणून क्रोधानें डोळे लाल करून आपली गदा गरगर फिरवूं लागला. इतक्यांत कोणीएक मनुष्य डोकीवर मांसाचा भारा घेऊन धापा टाकीत धांवत धांवत येत आहे असें त्यांनीं पाहिलें. तो जवळ येतांच **दुर्योधन** तुझ्या कोठें दृष्टीस पडला काय ह्मणून त्यांनीं त्याला विचारिलें. तेव्हां तो ह्मणाला, "महाराज, ह्या येथें जवळच एक सरोवर आहे, त्यांतील पाण्यामध्यें दोन मनुष्यांचीं पावलें गेलेलीं दिसत आहेत. त्यांतील एकाचीं पावलें परत आलेलीं दिसतात. दुसऱ्याचीं दिसत नाहींत; यावरून आपण काय असेल तें पाहावें." हें ऐकतांच तिघेही त्या मनुष्याला बरोबर घेऊन त्या सरोवराकडे गेले. **दुर्योधनाला** जलस्तंभिनी विद्या साध्य होती हें **श्रीकृष्णाला** माहित होतें, त्यावरून तो पाण्यांत जाऊन खचित पडून बसला

अमावा असा त्याणें तर्क केला. नंतर **भीमसेनानें** नक्रादिक सकळ जलचरांस त्रास होई अशा जोरानें त्या सरोवरांतील पाणी हातानें ढवळलें आणि मोठ्यानें ओरडून ह्मणाला, “ अरे, अंगीं नसत्या पौरुषाचा वृथाभिमान बाळगणाऱ्या आणि **पांडववधूच्या** केशांबरांचें कर्षण करून महत्पातकांत पडणाऱ्या **धार्तराष्ट्राधमा,** तुझे सर्व भ्राते मारून त्यांच्या स्त्रियांच्या केशपाशविमोचनानें **द्रौपदी**चा प्रदीप्त झालेला कोपानल म्यां शांत केला हें तू जाणत असून व **दुःशासनाचें** वक्षस्थळ फोडून त्यांतील रक्ताचें पान म्यां केलें हें तुला माहीत असून यासमयीं निर्लज्जासारखा मला भिऊन चिखलांत लपून बसलास, तस्मात् तुला धिक्कार असो! या तुझ्या वर्तनानें निर्मळ चंद्रवंशाला मात्र तूं डाग लाविला!” इतकेंही बोलून तो जेव्हां बाहेर येईना तेव्हां **भीमसेनानें** मोठ्या क्रोधावेशानें आपली प्रचंड गदा

दोहों हातांनीं उचलली आणि तिणें,— पूर्वीं देवदानवांनीं समुद्र मंदराचळानें जसा घुसळिला, त्याप्रमाणें तें सरोवर तळापासून अगदीं ढवळून टाकिलें. त्या योगानें त्यांतील पाणी वेगानें वर उसळूं लागलें, त्याबरोबर आंतील कमलांचा विध्वंस झाला, नक्रादिजलचर बाहेर पडून पटापट प्राण सोडूं लागले, व पक्षी भयानें उडून गेले. याप्रमाणें गदामंदरानें तें सरोवर घुसळतांच क्षीराब्धिमंथनसमयीं काळकूट विष जसें बाहेर पडलें तसें त्या **दुर्योधनानें** आपलें डोकें वर काढिलें आणि मोठ्या क्रोधानें ह्मटलें, "मूर्खा, वायुपुत्रा, कां उगाच बडबड लाविली आहेस, मी तुला भिऊन एथें लपून बसलों असें समजूं नको; विश्रांति घेण्याकरितां पाताळीं जाऊन बसलों होतों." नंतर **कृष्णार्जुनांनीं** त्याला वर येऊन **भीमा**बरोबर गदायुद्ध करशील तरच तूं क्षत्रिय खरा असें ह्मटल्यावरून तो

वर आला आणि आपली गदा खालीं ठेवून प्रथम त्याणें रणभूमीकडे दृष्टि केली, तों आपल्या सर्व सैन्याची वाताहत झाली आहे, कोणीही वीर जिवंत राहिला नाहीं, गज, अश्व, पदाति इत्यादिकांच्या कलेवरांचा साऱ्या रणभूमीवर खच होऊन गेला आहे, त्यांवर कंक, गृध्र, जंबुक इत्यादि हिंस्रपक्षी बसून त्यांचा फाड करीत आहेत; सारांश, आपल्या पक्षाचा पूर्ण विध्वंस झाला आहे आणि **पांडवसैन्यांत** आनंदाचा सिंहनाद आणि रणवाद्यांचा घोष चालला आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्यासरसा त्यानें निराश होऊन दुःखाचा सुस्कारा सोडिला तेव्हां **भीमसेन** ह्मणाला, "अरे कौरवेश्वरा, सांप्रत तू दीन अनाथ झाला आहेस, आणि आह्मी पूर्ण विजयी झालों आहों; तथापि तुला वाईट वाटूं देऊं नको. तुझ्यामध्यें सामर्थ्य असेल तर हातांत गदा घे आणि आह्मांतून इच्छेस ये-

ईल त्याजबरोबर खुशाल युद्ध कर." हें ऐकून **दुर्योधनानें** डोळ्यांस पाणी आणून ह्मटलें, "**भीमा, कर्ण** आणि **दुःशासन** यांना तुह्मीं दोघांनीं मारिलें; तेव्हां तुह्मी दोघेही मला सारखेच शत्रु आहां; तथापि तुझ्याशींच युद्ध करावें असें माझ्या मनांत आहे." नंतर दोघेजण आपापल्या गदा हातांत घेऊन द्वंद्वयुद्धास तयार झाले. एकमेकांवर क्रोधावेशानें दांतओठ खाऊन एकमेकांस ते प्रथम वाक्प्रहार करूं लागले. शेवटीं दोघेही हातघाईवर येऊन परस्परांवर गदाप्रहार करूं लागले. याप्रमाणें त्यांचें घोरयुद्ध जुंपलें असतां **धर्मराजानें दुर्योधनाच्या** शोधार्थ पाठविलेल्या दूतांपैकीं **पांचालक** नांवाचा एक दूत त्या ठिकाणीं येऊन पोंचला. त्याला **श्रीकृष्णानें** सर्व हकीकत सांगून ती **धर्मराजास** जाऊन कळविण्यास सांगितली व असा निरोप सांगून पाठविला कीं, ज्या अर्थीं आतां **दुर्योधन भीमसे-**

नाच्या तावडींत सांपडला आहे त्याअर्थी तो आपली प्रतिज्ञा पुरी करून लवकरच तुमच्या दर्शनास येईल. **कौरवांच्या** पूर्ण पराजयाविषयीं आतां कांहीं संशय उरला नाहीं. तुह्मांला या पृथ्वीवर आतां कोणी शत्रु राहिला नाहीं असें समजून सुवर्णकलश जलानें भरून आपणास राज्याभिषेक करवावा, आणि **द्रौपदीच्या वेणीबंधना**चा महोत्सव आनंदानें व मोठ्या थाटानें करावा. हा निरोप **पांचालकानें धर्मराजास** येऊन कळवितांच त्याला मोठा हर्ष झाला, व **द्रौपदीच्या** डोळ्यांतून आनंदाश्रु वाहूं लागले. **धर्मराजानें पांचालकास** तें शुभवर्तमान कळविल्याबद्दल मोठें इनाम देऊन संतुष्ट केलें, व **कृष्णाज्ञेप्रमाणें भीमसेनास** जयप्राप्ति व्हावी ह्मणून जिकडेतिकडे मंगलसमारंभ चालू केले.

जयाविषयीं निःशंक रहावें असा निरोप **श्रीकृष्णा**कडून जरी आला तरी अंतर्यामीं **धर्म-**

**राज** मोठ्या काळजींत पडला. गदायुद्धामध्यें **भीमसेना**ची बरोबरी करणारा कोणी नाहीं हें त्याला माहीत होतें; तथापि **दुर्योधन**ही गदायुद्धांत **बलरामा**प्रमाणेंच कुशल असल्यामुळें युद्धाच्या परिणामाविषयीं त्याचें मन मोठ्या धाकधुकींत होतें; यासाठीं **भीमसेनास** जय यावा ह्मणून तो परमेश्वराची करुणा भाकूं लागला.

इतक्यांत असा चमत्कार झाला कीं, **चार्वाक** नांवाचा एक राक्षस **दुर्योधना**चा मित्र होता तो कांहीं कपटयुक्ति करून **पांडवांस** संकटांत घालावें अशी दुर्बुद्धि मनांत धरून अतिथीच्या वेषानें **धर्मराजा**कडे आला, आणि, "अहो, मी वृद्ध ब्राह्मण तृषाक्रांत झालों आहें, मला कोणी शीतल छायेंत बसवून थंडगार पाणी प्यावयास द्या; नाहींतर मी आतां मरतों" असें दीनस्वरानें ह्मणूं लागला. चोबदारानें हा प्रकार पाहून **धर्मराजास** कळवितांच त्यानें त्या अति-

थीला आंत आणण्यास सांगितलें, व आंत आ-
ल्यावर त्याला नमस्कार करून बसावयास आ-
सन दिलें आणि थंडगार, सुवासिक उदका-
नें भरलेला कलश त्याच्यापुढें आणून ठेविला.
अतिथीनें हातपाय धुतले व नेत्रस्पर्श करून उ-
दक प्राशन करणार इतक्यांत स्मरण झाल्यासार-
खें करून ह्मटलें, "अहो तुह्मी जातीचे क्षत्रिय
आहां, आणि तुमचे आप्तगणगोत सांप्रत चाल-
लेल्या **कौरवपांडवांच्या** युद्धांत दररोज मरण
पावत आहेत, तेव्हां यावेळेस तुमच्या घरीं पा-
णी पिणें योग्य नाहीं. असो, चिंता नाहीं. एथें
सावलींत बसून थंडगार वारा सुटला आहे त्या-
च्या स्पर्शानेंच मी आपल्या श्रमाचा परिहार
करीन." इतके श्रांत होण्याचें कारण काय अ-
सें **धर्मराजानें** त्याला विचारिलें; तेव्हां तो ह्म-
णाला, "क्षत्रियांच्या युद्धाची मौज पाहण्याक-
रितां मी या प्रदेशांत फिरत असतों. आज अ-

र्जुन व **दुर्योधन** यांचें गदायुद्ध चाललेलें पहात असतां उन्हानें व ताहानेनें फार व्याकुळ झालों, ह्मणून तसेंच तें पाहाण्याचें सोडून इकडे निघून आलों." **अर्जुनदुर्योधनांचें** युद्ध चाललें आहे हें ऐकतांच **धर्मराज** मनांत फार घाबरला आणि अतिथीला ह्मणाला, "मुनिवर्य, **भीमदुर्योधनांचें** युद्ध चाललें असून तुह्मी असें कसें बोलतां? काय असेल तें स्वस्थ मन करून सांगा." अतिथि ह्मणाला, "अहो **भीमा**बरोबर चाललेलें युद्ध तर केव्हांच संपलें, त्याची गोष्ट आतां कशाला पाहिजे!" हे शब्द ऐकतांच **धर्मराज** आणि **द्रौपदी** यांना मूर्च्छा येऊन तीं धाडकन् खालीं पडलीं! हें पाहून तो ढोंगी अतिथि मनांत फार हर्ष पावला आणि हीं कोण आहेत ह्मणून चोबदारास विचारूं लागला. त्याणें, हा **धर्मराज भीमसेना**चा ज्येष्ठ भ्राता व ही **पांडववधू पांचाली** असें जेव्हां सांगितलें

तेव्हां, "अरेरे! यांना हें वर्तमान कळवून यांचा मीं घात केला," असें तो वरकांतीं ह्मणूं लागला. थोड्या वेळानें तीं उभयतां सावध होऊन शोक करूं लागलीं. **धर्मराज** त्या अतिथीच्या विनवण्या करून विचारूं लागला, "मुनिवर्य, असें संदिग्ध भाषण करून मला दुःख देऊं नका. काय असेल तें स्पष्ट बोला. वत्सा **भीमसेना**च्या जिवास जर कांहीं अपाय झाला असेल तर तसेंच सांगा, ह्मणजे प्राणत्याग करून मी सुखी तरी होईन." हें भाषण ऐकून तो ढोंगी आपला प्रयत्न सिद्धीस गेला ह्मणून मनांत फार हर्ष पावला, आणि ह्मणाला, "राजा, मला क्षमा कर, तू त्या **भीमा**चा ज्येष्ठ भ्राता व ही साध्वी **द्रौपदी** तुमची स्त्री हें मला माहीत असतें तर मी येथें आलोंच नसतों. असो, झाल्या गोष्टीस उपाय नाहीं; परंतु अशी गोष्ट उगीच पाल्हाळ लावून

सांगत **बसणें** योग्य नाहीं; यास्तव थोडक्यांत सांगतों इकडे लक्ष दे. राजा, अशी गोष्ट घडून आली कीं, **भीम** आणि **दुर्योधन** यांचें प्रथम गदायुद्ध चाललें तेव्हां **बळराम** तेथें आला. तो **दुर्योधना**चा पक्षपाती हें तुला माहीत आहेच. जेव्हां दोघेही एकमेकांस आटोपेनात तेव्हां **बळरामानें दुर्योधनास** कांहीं गुप्त संकेत केला, त्यांतील इंगित जाणून त्याप्रमाणें गदेचा प्रहार करतांच **भीमसेन** गतप्राण होऊन खालीं पडला ! "

हे शब्द कानीं पडतांच, हा वत्सा **भीमसेना** ! असें ह्मणून **धर्मराज** धाडकन् खालीं पडला. **द्रौपदी**ही " हा प्राणनाथ, माझ्या प्रीत्यर्थ तुह्मीं इतके प्रयास करून शेवटीं मला टाकून कोणीकडे गेलां ! एकवार तरी मजजवळ बोला ! " असें ह्मणून मूर्च्छित झाली. सेवकजनांनीं त्यांस वारा घालून सावध केल्यावर अतिथि ह्मणाला, " राजा धीर धर, धीर धर, असा

घाबरूं नको, थोडी हकीगत सांगावयाची राहिली आहे एवढी ऐकून घे, आणि मग काय करणें असेल तें कर.—पुढें असें झालें कीं, तो प्रतापशाली **भीमसेन** वीरलोकास गेला हें पाहून **अर्जुन** ढळढळां रडूं लागला, व त्या शोकभरांत त्याणें आपलें **गांडिवधनुष्य** खालीं टाकून दिलें. तेव्हां **दुर्योधन** त्याला कांहीं टाकून बोलला तें त्याला सहन न होऊन त्यानें रक्तानें भरलेली **भीमा**च्या हातांतील गदा घेऊन क्रोधावेशानें **दुर्योधना**च्या अंगावर उगारिली. **दुर्योधनानें**ही आपली गदा हातांत सरसावून धरिली. लवकरच उभयतां हातघाईवर आले, त्यांत **अर्जुनास** खचित यश येणार नाहीं व त्याच्या जिवास कांहीं अपाय झाला तर **श्रीकृष्णास** वाईट वाटेल ह्मणून **बळरामानें** मोठ्या जुलमानें **श्रीकृष्णास** रथांत घालून **द्वारकेची** वाट धरिली!

हें वर्तमान ऐकतांच **धर्मराजा**च्या दुःखास सीमाच राहिली नाहीं. **गांडिव**धनुष्याचा त्याग करून एकटा **अर्जुन दुर्योधना**बरोबर झगडत आहे व तशा स्थितींत **श्रीकृष्ण** भगवान्ही त्याला सोडून गेले, यावरून त्याचाही परिणाम **भीमसेना**सारखाच होणार याविषयीं त्यास संशय राहिला नाहीं. **भीमसेना**चे पराक्रम आठवून तर तो ढळढळां रडूं लागला, आणि ह्मणाला, "बा, भीमा, म्यां मूर्खानें द्यूताच्या नादास लागून तुला अनेक प्रकारच्या विपत्तींत घातलें, तथापि तितक्याही सोसून केवळ बंधुप्रीत्यर्थ तू माझ्या आज्ञेबाहेर कधीं वागला नाहींस. मग आजच त्याहून अधिक असें कोणतें दुःख म्यां तुला दिलें, कीं ज्याच्या योगानें मजवर रुसून मला अनाथाला सोडून परलोकीं चालता झालास? अरे, **बक, हिडिंब, किर्मीर** आदिकरून महाक्रूर राक्षसांचा तूं हांहां ह्मणतां नाश केलास. ज-

**रासंध, कीचक** यांसारख्या महाबलाढ्य वीरांचाही तूं आपल्या भुजबलानें चुराडा करून टाकिला, एवढ्या तुझ्या अतुल सामर्थ्याचा आजच कसारे बा अस्त झाला! वत्सा, तू तर आह्मांस सोडून गेलासच; पण **पार्था**विषयींही म्यां आतां निराश व्हावें हें केवढें दुर्भाग्य! बा **बलरामा, भीम** आणि **दुर्योधन** हे दोघेही तुझे प्रियशिष्य व दोघांवर तुझें सारखें प्रेम, असें असून दुर्योधनाविषयींच तुझा एवढा पक्षपात असावा काय? तसेंच **पार्था**वर भगवंताचें अत्यंत प्रेम होतें हें तुला माहित असून त्याला प्राणसंकटांत पडलेला पाहून तुह्मीं दोघांनींही त्याला सोडून जावें हें तुह्मांस योग्य वाटलें काय?" याप्रमाणें नानाप्रकारेंकरून तो विलाप करूं लागला, **अर्जुना**च्या प्राणावर आलेलें संकट ऐकून **द्रौपदी**ही अत्यंत शोकाकुल झाली, आणि **भीमसेना**स उद्देशून ह्मणाली,

"अहो प्राणनाथ, गदायुद्धांत अनभिज्ञ असा तुमचा प्रियभ्राता शत्रूच्या कचाटींत सांपडलेला पाहून त्याला सोडून तुमच्यानें जाववलें तरी कसें? धांवा लवकर आणि त्याचा सांभाळ करा. मला तुह्मी टाकून गेलां; पण "तुझी वेणी मी शत्रूच्या रक्तानें माखलेल्या हातांनीं घालीन" अशी जी तुमची प्रतिज्ञा तिची वाट काय! प्रतिज्ञा पूर्ण न करणें क्षात्रधर्मास योग्य नव्हे हें तुह्मी विसरलां काय? पण चिंता नाहीं, अंमळ थांबा. मीच तुमच्याकडे वेणी घालून घेण्याकरितां निघून येतें." असें ह्मणून **धर्मराजास** तिणें चिता प्रदीप्त करण्याविषयीं विनंति केली, आणि ज्यानें **भीमसेनाचे** प्राण हरण केले त्याचा सूड घेतल्यावांचून तुह्मीं राहूं नये असें सांगितलें. **धर्मराज** ह्मणाला, "प्रिये, सूड घेऊन काय करावयाचें आहे? मला तें राज्य नको आणि कांहीं नको. **भीमार्जुन** जिकडे

गेले तीच वाट मी धरणार, असें केल्यानें देवांपेक्षांही ज्यांचा पराक्रम अधिक अशा माझ्या भ्रात्यांस पाहून मी कृतार्थ होईन; यासाठीं हे **पांचालराजतनये द्रौपदि**, आपण उभयतां बरोबरच अग्निनारायणास देह अर्पण करून त्यांच्या भेटीस जाऊं."

हें **धर्मराजाचें** भाषण ऐकून तो ढोंगी अतिथि आपले मनोरथ पूर्ण झाले ह्मणून हर्षभरित होत्साता तेथून निघून गेला. **धर्मराजानें** सेवकांस सांगून चिता तयार करविली आणि तीं उभयतां स्त्रीपुरुषें तींत आपल्या देहांच्या आहुति देण्यास तयार झालीं. प्रथम **धर्मराजानें** चोबदाराच्या हातें **कुंतीमातेला** असा निरोप सांगून पाठविला कीं, ज्यानें लाक्षागृहांतून काढून तुझे आणि आमचे सर्वांचे प्राण वांचविले, व **किर्मिर, बकासुर, हिडिंबासुर** आदीकरून क्रूर राक्षसांचा ज्यानें आपल्या बाहु-

बलानें नाश केला तो तुझा बलशाली प्रिय-पुत्र **भीमसेन** आमच्या दुर्भाग्यामुळें आज परलोकास गेला, व ही दुःखाची वार्ता तुला कळविण्याचें माझ्या कपाळीं आलें आहे. नंतर त्याणें आपला आवडता व आज्ञाधारक कनिष्ठ भ्राता **सहदेव** यास असें सांगून पाठविलें कीं, तू आमच्या कुलांत बृहस्पतीसारखा बुद्धिमान् आहेस. अभ्युदयांत जसा तू उन्मत्त होणारा नव्हस तसाच विपत्काळीं धैर्य व नीति यांस सोडणाराही नव्हस. तू वयानें लहान आहेस; तरी ज्ञानानें मजपेक्षां कमी आहेस असें नाहीं व बुद्धीनें तर मजपेक्षांही तू अधिक आहेस; तस्मात् **भीमार्जुनांस** भेटण्याकरितां मी परलोकीं गेलों हें जाणून शोक करूं नको. विवेकानें आह्मांवरील प्रेम शिथिल करून आह्मांस व पित्यास उदक देण्याकरितां पुष्कळ दिवसपर्यंत या लोकीं वास कर. तुझा भ्राता **नकुल** हा आमच्यासार-

खाच अभिमानी आहे, तरी त्याचें मन न दुखवितां उभयतां एक विचारानें वागत जा व आपल्या दायादांच्या घरीं अथवा यादवांच्या घरीं किंवा इच्छा असल्यास अरण्यांत तपश्चर्या करून उभयतां आयुष्याचे दिवस कसेतरी घालवा." **द्रौपदीनें**ही आपल्या दासीच्या हातें **सुभद्रेस** सांगून पाठविलें कीं, उत्तरा[१] चार महिन्यांची गरोदर आहे; तिच्या जिवास चांगली जपत जा; कारण तिचा गर्भच काय तो आतां आमच्या कुलाचा प्रतिष्ठापक होणार आहे. परमेश्वरकृपेनें तो उदयास आला तर तोच आह्मांस परलोकीं पिंडोदक देणारा होईल." हा **द्रौपदी**नें सांगितलेला निरोप ऐकून **धर्मराजा**च्या डोळ्यांतून खळखळां अश्रुधारा वाहूं लागल्या आणि तो ह्मणाला, हरहर! केवढी ही दुराशा! ज्या **पांडुकुलरूप** वृक्षाच्या शाखा सर्वपृथ्वीभर पस-

१ अभिमन्यूची स्त्री.

रून त्यांणीं दशदिशा व्याप्त केल्या असा विस्तीर्ण आणि गगनचुंबित वृक्ष दुर्दैवानें एकाएकीं दग्ध झाला असून त्याच्या अतिसूक्ष्म अंकुरापासून आतां सुखप्राप्तीची आशा करण्याचा प्रसंग यावा हें केवढें दुर्भाग्य!" चोबदार निरोप घेऊन जावयास निघाला इतक्यांत **धर्मराजानें** त्यास माघारें बोलाविलें आणि सांगितलें बाबा **जयंधरा,** "सुदैवानें जर माझा **अर्जुन** बाळ जिवंत असला तर त्याला एवढा निरोप सांग कीं, **भीमा**च्या मरणाला **बलराम** जरी कारण झाला तरी तो **श्रीकृष्णा**चा भ्राता व तुझा मित्र हें मनांत आणून त्याच्याविषयीं मनांत क्रोधबुद्धि धरूं नको, व माझ्यावरील प्रेम कमी करून आजपासून अरण्यांत जाऊन कसें तरी कालक्रमण कर; पण अत्यंत कठोर व परिणामीं दुःख देणारा असा जो क्षात्रधर्म त्याचें इतःपर कधीं अवलंबन करूं नको." याप्रमाणें निरोप घेऊ-

न **जयंधर** चोबदार निघून गेला. जातांना **भोज**राजाच्या मंदिराची जी केवळ पताका अशा **कुंती**सहवर्तमान आतां सगळ्या **पांडु**कुलवनाचा विध्वंस होणार व या सर्व विपत्तीला कारण **बलराम** असून त्याला **श्रीकृष्ण**परमात्माही अनुकूल झाला यामुळें त्याला अत्यंत दुःख होऊन तो रडूं लागला.

सारांश, ज्याणें राजसूय यज्ञ करून अग्नीस संतुष्ट केलें, जो अग्नीला खांडववन देऊन तृप्त करणाऱ्या **अर्जुना**चा ज्येष्ठ भ्राता, ज्याला **युधिष्ठिर** हें यथार्थ नामाभिधान प्राप्त झालें, असा तो चंद्रवंशास शोभविणारा राजर्षि **धर्मराज**, यज्ञवेदीपासून निर्माण झाल्यामुळें जिला **याज्ञसेनी** ह्मणतात व जी **पांचाल**राजाची केवळ कुलदेवता अशा त्या **द्रौपदी**सहवर्तमान निर्दय कालानलामध्यें काष्ठाप्रमाणें आपणास जाळून घेण्यास तयार झालेला पाहून सर्व सेवक-

जन खळखळां रडूं लागले व त्याचें संरक्षण करण्याविषयीं लोकपालांची करुणा भाकूं लागले. **धर्मराजानें** त्यांची समजूत करून उदक आणावयास सांगितलें. तें येतांच त्याणें हस्तपाद प्रक्षालन करून आचमन केलें व लोकप्रवृत्तीस अनुसरून गुरु **भीष्माचार्य**, पितामह **विचित्रवीर्य** व प्रपितामह **शंतनु** यांस जळांजलि दिली, आणि शेवटीं डोळ्यांस पाणी आणून पूज्य पिता जो **पंडुराजा** त्याचें स्मरण करून त्याच्या नांवानें त्याणें शेवटचें उदक सोडिलें. नंतर सुक्षत्रियांच्या गतीस पावलेल्या **भीमसेना**च्या भेटीविषयीं उत्सुक होत्साता त्याच्या बाललीला आठवून तो ह्मणाला, वत्सा **भीमसेना**, बालपणीं मीं मातेचें स्तनपान केल्यावर अवशिष्ट राहिलेलें दुग्ध त्वां प्राशन करावें. तसाच कोणताही पदार्थ मीं खाल्ल्यावर राहिलेला अवशिष्ट अंश त्वां भक्षण करावा अशी तुझी वृत्ति

होती; यासाठीं हा मी तुला जलांजलि देत आहें यांतील उदक मी येईतोंपर्यंत राखून ठेव मी आलों ह्मणजे उभयतां बरोबरच तें प्राशन करूं," असें ह्मणून त्याणें उदक सोडिलें. नंतर **द्रौपदीनें** हातांत उदक घेऊन "प्राणनाथ, हें दासीनें दिलेलें उदक आपणास स्वर्गलोकीं पाय धुण्याच्या उपयोगीं पडो" असें ह्मणून तें खालीं सोडिलें.

हा हृदयद्रावक देखावा पाहून जवळच्या मनुष्यांचीं अंतःकरणें फारच हळहळलीं. इतक्यांत **धर्मराजा**चा उजवा डोळा लवूं लागला, तेव्हां या सुचिन्हावरून **भीमसेना**ची स्वर्गलोकीं लवकरच भेट होईल असें समजून त्याला समाधान वाटलें, आणि **द्रौपदी**चा हात धरून तो पेटलेल्या चितेजवळ जाऊन उभा राहिला.

इकडे सरोवराच्या कांठावर **भीम** व **दुर्योधन** यांचें गदायुद्ध चाललेंच होतें. उभयतांनीं

एकमेकांवर गदेचे भयंकर प्रहार केले. शेवटीं **भीमसेनानें दुर्योधनाच्या** मांडीवर जो एक मोठा गदेचा तडाखा मारिला त्याच्या योगानें तो गतप्राण होऊन खालीं पडला. **भीमसेनाचें** सर्व शरीर रक्तानें भरून गेलें होतें, तसाच तो **द्रौपदीची** वेणी घालण्याची आपली प्रतिज्ञा पूर्ण करण्याकरितां तिचा शोध करीत धांवत धांवत येत होता. त्याची ती भयंकर मुद्रा दुरून पाहून व त्याच्या मरणाची वार्ता पूर्वींच ऐकिली होती ह्मणून हा दुष्ट **दुर्योधनच** हातांत गदा घेऊन आपणास मारण्याकरितां येत आहे असें **धर्मराजास** वाटलें व त्याच्या येण्यावरून **अर्जुनही** युद्धांत मरण पावला अशी त्याची खातरी होऊन, "हा **गांडिवधरा अर्जुना**! शेवटीं तूही, इतकेंच बोलून मूर्च्छित होऊन तो धाडकन् खालीं पडला. **द्रौपदीही** "हा प्राणनाथ, मी तुमची स्वयंवरवधू असून मला व **युधिष्ठिर** म-

हाराजांस न विचारितां किंवा आपल्या माते-
च्याही निरोप न घेतां प्रियबंधूच्या भेटीस गेलां हें तुह्मांस कसें आवडलें? असें ह्मणून मूर्छित झाली. थोड्या वेळानें तीं उभयतां शुद्धीवर आल्यावर **धर्मराज अर्जुना**चे पराक्रम आठवून अत्यंत शोक करीत असतां **दुर्योधना**ची भ्रांति उत्पन्न करणारा **भीमसेन** जवळ जवळ येत चालला. येतांना तो मोठ्यानें ओरडून ह्मणाला, "अहो, या रणसंग्रामांत अवशिष्ट राहिलेले योद्धे हो! तुह्मी मला भिऊं नका. मजपासून कोणालाही उपद्रव होणार नाहीं; पण ती **याज्ञसेनी द्रौपदी** कोठें आहे ती दाखवा. ती कोणती ह्मणाल तर सांगतों ऐका. **दुःशासनानें** भरसभेंत जिला वेणी धरून ओढीत आणिलें व नग्न करण्यासाठीं जिचें वस्त्र फेडिलें आणि दासी ह्मणून मांडीवर येऊन बस असें **दुर्योधन** जिला ह्मणाला तीच **द्रौपदी** सांप्रत

मला पाहिजे आहे." हें उद्दामपणाचें भाषण ऐकून, आतां या अनाथ अबलेची हा **कौरवा-धम** खचित दुर्दशा करणार असें **युधिष्ठिरास** वाटलें, व त्याची दुःखावस्था क्षणभर नाहींशी होऊन क्षात्र तेजाचा त्याच्या अंगीं संचार झाला. नंतर त्यानें **द्रौपदीस**, "प्रिये, घाबरूं नको, स्वस्थ राहा, या दुष्टावर बाणांचा वर्षाव करून आतांच याचा फडशा पाडितों," असें सांगून मोठ्या त्वेषानें **दुर्योधनास** उद्देशून ह्म-णाला, "मूर्खा कुरुकुलांगारा, **दुर्योधना**, तुझे सकल भ्राते नष्ट झाले असून अद्यापि निर्लज्जा-सारखें तूं जीवित धारण केलें आहे तसा मी नव्हें. **जरासंधाचे** प्राण हरण करणारा माझा **भीमसेन** व किरातरूप धारण करणाऱ्या **श्री-शंकराशीं** युद्ध करून आपल्या पराक्रमानें त्यास संतुष्ट करणारा माझा **पार्थ** हे आतां जि-वंत नसल्यामुळें त्यांच्या मागें प्राण धारण क-

रण्यास मी जरी समर्थ नाहीं, तरी तुझे प्राण हरण करण्या पुरतें सामर्थ्य अद्यापि माझ्या अंगांत आहे." असें ह्मणून त्यानें आपलें धनुष्य आणि बाणांचा भाता आणण्याविषयीं चोबदारास आज्ञा केली. भीमसेनाचें रक्तानें भरलेलें सर्वांग व भयंकर मुद्रा पाहून तो ज्या मार्गानें येत होता त्यांतील सर्व लोक भयानें पळत सुटले. त्यांस तो ह्मणाला, "अहो या स्यमंत पंचकांत संचार करणारे लोक हो, या युद्धरूप प्रलयाग्नींत तुह्मी सांपडलां असून जिवंत राहिलां हें मोठें भाग्य समजा व आतां मला पाहून असे घाबरून जाऊं नका आणि अश्वगजादिकांच्या कलेवरांआड दडून बसूं नका. मी कोणी राक्षस नाहीं किंवा भूतपिशाच्च नाहीं. स्वभावतःच माझी मुद्रा रागीट दिसते; तशांत शत्रूच्या रक्तानें माझें सर्वांग भरलेलें आहे, ह्मणून तुह्मांस भय वाटतें; पण तें व्यर्थ आहे. म-

जपासून तुह्मांला कांहींएक उपद्रव होणार नाहीं अगाध प्रतिज्ञासागर वलांडून मी एथें प्राप्त झालों आहें, तर ती **याज्ञसेनी** कोठें आहे ती दाखवा." असें ह्मणत ह्मणत तो जवळ येऊन पोंचला. **धर्मराजास** हा **दुर्योधनच द्रौपदी**चा पाठलाग करीत आला आहे असें अद्यापिही वाटत होतें; ह्मणून त्यानें तिला लवकर अग्नींत उडी टाकावयास सांगितलें व आपलें धनुष्य जवळ नाहीं असें पाहून त्या दुष्टाला धरून अग्नींत ढकलून द्यावें अशा निश्चयानें तो मोठ्या वेगानें त्याच्या अंगावर धांवून गेला, आणि तो ह्मणाला, "दुष्टा, **भीमार्जुनशत्रो**, बालपणापासून त्वां केलेले सर्व अपराध म्यां निमुटपणें सोशिले; पण आज माझ्या प्रिय भ्रात्यांचा त्वां घात केला, या कृत्याचा सूड उगविल्यावांचून मी कधीं राहावयाचा नाहीं. अधमा, आतां माझ्या हातांतून सुटून कसा वांचतोस तें पाहातों."

इकडे **द्रौपदी** अग्निप्रवेश करावयास सिद्ध झालेली पाहून **जयंधर** चोबदार तिला ह्मणाला, "हे **पंडुराजस्नुषे द्रौपदी**, तुझ्या दुःखाच्या प्रतीकाराची आशा आतां उरली नाहीं; यासाठीं **दुःशासनानें** ओढल्यामुळें मोकळे होऊन तुझ्या डोळ्यांवर येत असलेले हे तुझे केश आपल्याच हातांनीं तरी मागें सारून बांध आणि मग अग्निप्रवेश कर." **धर्मराज** ओरडून ह्मणाला, "**पांचाली**, थांब थांब, घाई करूं नको. या चांडाळाला मारल्यावांचून केश बांधावयाचे नाहींत." तिकडून **भीमसेनही** मोठ्यानें ओरडून ह्मणाला, "प्रिये **द्रौपदी**, हा **भीमसेन** जिवंत असतां तूं आपली वेणी आपल्या हातानें बांधतेस हें काय? अमळ धीर धर, मी स्वतः त्या दुष्टाच्या रक्तानें भरलेल्या या हातांनीं ती बांधणार!" **भीमसेन** मरण पावला असून हे शब्द जेव्हां तिच्या कानीं पडले तेव्हां ती मोठ्या गों-

धळांत पडून इकडे तिकडे फिरूं लागली. तिला मी स्वप्नांत आहें किंवा जागृतावस्थेंत आहें हें कांहींच कळेना. इतक्यांत **भीमसेन,** अगे भित्रे, तू चाललीस कोठें असें ह्मणून तिचे केश धरावयास धांवला. तें पाहून **धर्मराजानें दुर्योधनाच्या** भ्रांतीनें त्याच्या कमरेस मोठ्या जोरानें विळखा घातला आणि दुष्टा **दुर्योधना,** असें ह्मणून कांहीं बोलत आहे तोंच **भीमसेन** हंसून ह्मणाला, "दादा, हें काय तुह्मीं मांडिलें आहे ? मी **दुर्योधन** नव्हें. तुमचा आज्ञाधारक भ्राता **भीमसेन** आहें, मला सोडा. **जयंधर** चोबदार **भीमसेनास** ओळखून हर्ष पावून **धर्मराजास** ह्मणाला, "महाराज, हा तुमचा मोठा भाग्योदय समजावयाचा. हेच आपले आयुष्मन् **भीमसेन** महाराज खचित, बरें झालें, हे या वेळेस एथें आले; नाहींतर मोठा अनर्थ झाला असता. **दुर्योधनाच्या** रक्तानें यांचें सर्व श-

रीर व वस्त्रें भरून तांबडीं लाल झालीं असल्यामुळें हे प्रथम आपणास ओळखूं आले नाहींत; पण आतां कांहीं संशय राहिला नाहीं.'' बिचारा **धर्मराज** हें भाषण ऐकून अगदीं गोंधळून गेला, आणि " खरेंच कायरे **जयंधरा,** हा माझा वत्स **भीमसेन** ? हा दुष्ट **दुर्योधन** आमचा वैरी नव्हे ना ?'' असें वारंवार विचारूं लागला. तेव्हां **भीमसेन** ह्मणाला, "हे अजातशत्रो **धर्मराज,** मजकडे नीट न्याहाळून पाहा ह्मणजे आपली खातरी होईल. त्या **पांडुकुलवै**-ऱ्याचें नांव आतां कशाला घेतां ? मीं त्याचा केव्हांच फडशा पाडिला." **धर्मराजाला भीमसेना**चीं ओळख पटतांच जो हर्ष झाला त्याचें वर्णन कोठवर करावें ? त्याचा मुखचंद्र पाहून त्याच्या आनंदसमुद्रास जणूं काय भरतीच आली व त्यांत निमग्न असतां माझा **किरीटी** खुशाल आहे ना ? ह्मणून त्याणें विचारिलें. तो खुशाल

आहे असें समजतांच त्याच्या आनंदास पारावार नाहींसा झाला, व त्या भरांत त्याणें **भीमसेनास** मोठ्या प्रेमानें गाढालिंगन दिलें.

**चार्वाक** राक्षसानें कपटवेशानें येऊन **धर्मराजास** संकटांत घातलें हें वर्तमान **श्रीकृष्णभगवान्** यांस समजतांच त्यांणीं **नकुलाकडून** त्या दुष्टाचा नाश करविला व **अर्जुनास** बरोबर घेऊन त्याच्या भेटीस आले. उभयतांस पाहून **धर्मराजाला** अत्यंत हर्ष झाला. नंतर **श्रीकृष्ण** परमात्मा **धर्मराजास** ती सर्व हकीकत कळवून ह्मणाले, "राजा **युधिष्ठिरा,** आज तुझे सकल शत्रु लयास गेले. आतां आपल्या अनुजांसहवर्तमान सुखानें राज्य कर. तुझा सर्वदा विजय असो." हें ऐकून **धर्मराज** ह्मणाला, "हे भगवंता **वासुदेवा,** तू स्वतः आमचा पाठिराखा असतां आह्मांस कमी काय पडावयाचें आहे? जगाच्या उत्पत्तिस्थितिलयाला कारणीभूत असा

तू जगदात्मा सगुणरूपानें या विश्वांत अवतार घेऊन भक्तांचें संरक्षण करितोस. तुझ्या केवळ चिंतनानेंच त्रिविध तापापासून मुक्तता होते; मग तुझें साक्षात् दर्शन झालें असतां दुःखाची वार्ता कशास पाहिजे?" असें ह्मणून त्याणें **श्रीकृष्णास** नमस्कार केला, आणि **अर्जुनाला** मोठ्या प्रेमानें आलिंगन दिलें. नंतर **भीमसेन धर्मराजास** ह्मणाला, "महाराज, हा तुमचा भेटीचा समारंभ क्षणभर एकीकडे राहूं द्या. अद्यापि मुख्य कर्तव्य तें राहिलेंच आहे, तें कोणतें ह्मणाल तर **दुर्योधन** व **दुःशासन** यांच्या रक्तानें भरलेल्या हातांनीं **पांचालीची** वेणी घालावयाची आहे ती अगोदर मला घातली पाहिजे." असें ह्मणून तो **द्रौपदी**जवळ गेला. त्याचा जयजयकार करून ती लज्जेनें व भीतीनें एकीकडे सरकली. तें पाहून **भीमसेन** ह्मणाला. "हे राजपुत्री, मला पाहून तू त्रास पावूं नको. ज्या दुष्टांनीं तुला भरस-

भेंत वेणी धरून ओढीत नेलें व सर्वां देखत तुझी विटंबना केली त्यांच्या रक्तानें हें माझें सर्वांग भरून गेलें आहे व अशा हातांनीं तुझी वेणी घालीन अशी जी मीं प्रतिज्ञा केली होती ती पूर्ण करून तुझें समाधान करण्यासाठीं मी आलों आहें, " असें ह्मणून तशा हातांनीं त्याणें तिची वेणी घातली.

याप्रमाणें **वेणीबंधन** महोत्सव चालला असतां त्याचें अभिनंदन करणारी अशी आकाशवाणी झाली कीं, यज्ञवेदीपासून निर्माण झालेल्या **याज्ञसेनी** देवीचा केशपाश ज्या मदांधांनीं मुक्त केला त्या सर्वांचा नाश होऊन त्यांच्या स्त्रियांचे केशपाश आज मोकळे झाले, व **कौरवांच्या** नाशाविषयीं केवळ कृतांतस्वरूप धूमकेतूसारखा जो तिचा केशकलाप तो आज स्वस्थानीं विराजमान झाला. याउपर आतां या रणमखांत कोणाचीही आहुति न पडतां प्रजा व राजा सुखानें

नांदेल." इतक्यांत **धर्मराजास** राज्याभिषेक करण्याकरितां **श्रीव्यास, वाल्मीकि, जामदग्न्य, जाबालि**प्रभृति महर्षि, **नकुलसहदेव सात्यकि** प्रमुख सेनापति, तसेच **यादव, मत्स्य, मागध** इत्यादि कुलांतील राजकुमार खांद्यांवर तीर्थोदकानें भरलेले सुवर्णकलश घेऊन त्या ठिकाणीं आले आणि त्यांनीं **धर्मराजास** यथाविधि मंगलाभिषेक केला. याप्रमाणें **वेणीबंधनम**होत्सवाचा व राज्याभिषेकाचा समारंभ झालेला पाहून सर्वांस आनंद झाला. नंतर **श्रीकृष्णांनीं धर्मराजास** "तुझी आणखी काय इच्छा असेल ती सांग असें विचारिलें; तेव्हां **धर्मराज** ह्मणाला, हे देवा **पुंडरीकाक्षा**, तू प्रसन्न असतां कोणतीही वस्तु दुर्लभ नाहीं. पहा कीं, एवढा मोठा रणसंग्राम माजला असतां सकल शत्रुकुलाचा विध्वंस करून आमचें त्वां संरक्षण केलें व या **पांचालीला** दुःखसागरांतून

तारिलें, तेव्हां याहून आणखी अधिक तें काय मागावयाचें राहिलें आहे? तथापि हे भगवंता **पुरुषोत्तमा,** तू संतुष्ट होऊन देत असशील तर एवढें दे, ह्मणजे झालें:—

### श्लोक–स्रग्धरा.

औदार्ये लोक सारे विचरुनि जगिं या दीर्घजीवी असावे,
द्वैधातें सोडुनीयां तव पदकमलीं भक्तिनें लीन व्हावे. ।
टाकोनी मत्सरातें जन विबुधगणां नित्य देवोत मान,
राहो दक्ष प्रजेच्या अवनिं नृप सदा दे प्रभो हेंचि दान. ॥



# विक्रीचीं पुस्तकें.

| मराठी. | किंमत रु. आ. | टपाल. आ. |
| --- | --- | --- |
| यशोदागीत. ... ... ... | ०— ॥ | ॥ |
| राजगुरु दादोजी कोंडदेव आणि छत्रपति शिवाजी-महाराज. ... ... ... | ०— ६ | १ |
| रामनवमी. ... ... ... | ०— १ | ॥ |
| रुक्मिणीस्वयंवर. ... ... ... | ०— ८ | १ |
| वाल्मीकि रामायणाचें मराठी भाषांतर. | २०—० | रु.१ |
| विचारसाधन. ... ... ... | ०— ४ | ॥ |
| विष्णुबावा ब्रह्मचारीकृत वेदोक्तधर्मविचार. | ०— ७ | ॥ |
| विदुरवचन. ... ... ... ... | ०— २ | ॥ |
| विद्यार्थी. ... ... ... ... | ०— १॥ | ॥ |
| विद्यार्थ्यांचा व्याकरणमित्र. ... ... | ०— १॥ | ॥ |
| वियुक्तदंपति प्रहसन. ... ... | ०— ४ | ॥ |
| शनिमाहात्म्य. ... ... ... | ०— २ | १ |
| शिवलीलामृत. ... ... ... | ०— ८ | १॥ |
| शूद्रकमलाकर. ... ... ... | ४— ० | ४ |
| श्रीएकनाथचरित्र. ... ... ... | ०—१२ | २ |
| श्रीज्ञानेश्वरचरित्र. ... ... ... | ०—१२ | २ |

| | | | |
|---|---|---|---|
| देवीमाहात्म्य. ... ... ... | १– | ४ | २ |
| धर्मसिंधु. मराठी टिकेसहित ... ... | ६– | ० | ६ |
| धर्मराजद्रौपदीसंवाद. ... ... ... | ० | १॥ | ॥ |
| नलदमयंतीचरित्र. ... ... ... | ०– | ४ | ॥ |
| पथ्यापथ्यविचार. ... ... ... | ०– | २ | ॥ |
| फुलांची परडी ... ... ... | ०– | ४ | ॥ |
| बाळमित्र. ... ... ... | ०– | १ | ॥ |
| मनुवचन. ... ... ... | ०– | १ | ॥ |
| महामारी. ... ... ... | ०– | ६ | ॥ |
| मुलांस उत्तम बक्षीस.... ... ... | ०– | ८ | १ |
| मुलांचें कल्याण. ... ... ... | ०– | १॥ | ॥ |
| ययातिराजाची कथा. ... ... | ०– | १ | ॥ |
| चमत्कारिक नाटक. ... ... | ०–१० | | १ |
| वासवदत्ताकथासार. ... ... ... | ०– | १ | ॥ |
| मुद्राराक्षससार.... ... ... ... | ०– | ३ | ॥ |
| कादंबरीकथासार. ... ... ... | ०– | ३ | ॥ |
| आनंदराव. ... ... ... ... | ०– | ३ | ॥ |
| आर्यवृत्त. ... ... ... ... | ०– | १ | ॥ |
| आलफ्रेद धि ग्रेत ह्याचें चरित्र. ... | ०–१० | | १ |

| | | | |
|---|---|---|---|
| इंग्रजी सुरस रत्नमाला. ... ... | ०– ३ | ॥ |
| इंद्रियमहत्त्वविचार ... ... ... | ०– ८ | १ |
| कहाण्या. ... ... ... ... | ०– ३ | ॥ |
| कालिदासकविविरचित रघुवंशनामक महाकाव्य ह्याचें मराठी पद्यात्मक भाषांतर. ... | २– ० | ३ |
| गरुडपुराण. ... ... ... ... | १– ४ | २ |
| गीतापद्यमुक्ताहार. ... ... ... | २– ० | ० |
| गृहवैद्य. ... ... ... ... | ०–१२ | २ |
| छत्रपति संभाजीमहाराज. ... ... | १– ४ | २ |
| जन्माष्टमी. ... ... ... ... | ०– २ | ॥ |
| तुकारामाष्टक. ... ... ... ... | ०– ॥ | ॥ |
| दिनार्बस.... ... ... ... ... | ०–१४ | १॥ |
| दिवाळी.... ... ... ... ... | ०– १ | ॥ |
| सदाचार. ... ... ... ... | १– ४ | २ |
| सद्वर्तन. ... ... ... ... | ०–१२ | १॥ |
| साम्युएल जान्सन. ... ... ... | ०– ७ | १ |
| सावित्रीचरित्र. ... ... ... | ०– १ | ॥ |
| सुगम प्रियदर्शिका. ... ... ... | ०– २ | ॥ |
| सुलभशाकुंतल. ... ... ... | ०– २॥ | ॥ |

| | | |
|---|---|---|
| सुलभ शांकुतल उत्तरभाग ... ... | ०-३ | । |
| सुशीलयमुना अथवा वासुदेव बळवंत फडक्यांच्या बंडाची धामधूम. ... ... | ०-१२ | १॥ |
| सोळासोमवार. ... ... ... | ०- १ | ॥ |
| स्त्रीशिक्षणबोध. ... ... ... | ०- २ | ॥ |
| हरिविजय. ... ... ... | १- ८ | ८ |
| मऱ्हाठ्यांच्या संबंधानें चार उद्गार. ... | ०- १। | ॥ |
| हरिदासबत्तिशी. ... ... ... | ०- ४ | ॥ |
| नागानंदसार. ... ... ... | ०- २॥ | ॥ |
| भाऊबंदांत कलह उत्पन्न होण्याचीं कारणें काय? आणि त्याच्या निवारणाचे उपाय. ... | ०- ४ | ॥ |
| कहाण्या भाग दुसरा. ... ... ... | ०-५ | १ |
| एकादशीमहात्म्य. ... ... ... | ०-१॥ | ॥ |
| स्वर्गारोहणाचे अभंग. ... ... ... | ०-॥ | ॥ |
| ध्रुवाख्यान. ... ... ... ... | ०-॥ | ॥ |
| दामाजीपंताचें चरित्र. ... ... ... | ०-॥ | ॥ |
| नाटकी गंगू. ... ... ... ... | ०-१ | ॥ |
| देहावर निराकारी पदें व अभंग. ... | ०-१॥ | ॥ |
| भूपाळ्या. ... ... ... ... | ०-॥ | ॥ |

